महानुभाव

# दैनिक उपासना

( तृतीयावृत्ति )



लेखक :-

श्री. संत सत्यप्रेमी

संपादक, महानुभाव मासिक



मूल्य :*: ७५ न. पैसे

प्रकाशक :

कृ. मु. महानुभाव
संस्थापक आणि संचालक,
श्रीगीता-आश्रम,
तिलक रोड,
हैदराबाद (आंध्र प्रदेश).

●

तृतीयावृत्ति :
वर्षारंभदिन श. १८८३

●



●

मूल्य :
पंच्याहत्तर नये पैसे.

●

मुद्रक :
दी मारवाडी प्रेस लि.
अफजलगंज, है. आंध्र प्रदेश.

# प्रकाशकाचे निवेदन

## ( तृतीयावृत्ति )

नश्वर शरीराचे आरोग्य रक्षण्याकरितां विविधप्रकारचे खाद्यपदार्थ, निरनिराळे व्यायाम, कित्येक प्रकारच्या औषध्या, रंगबेरंगी कपडे व निवाऱ्याकरितां घरें इत्यादि अनेक उपाय आपण आवलंबितों; पण आपल्या आत्म्याचे आरोग्य रक्षण्याकरिता म्हणजे अनादि कालापासून जीवास लागलेली अविद्या व मतित्रयरूपि व्याधि नष्ट होण्याकरिता आपण कोणकोणते उपाय करीत आहोत, याचा कधी आपण विचार केला आहे काय ?

अनंतकालापासून अनेक जन्मांत आपण केवळ या नाशवान शरीराचेच चोचले पुरवीत आलो आणि त्याचीच जोपासना केली, त्यामुळेच संसारचक्रांत आजपर्यंत भ्रमत आहोत; आणि या जन्मी देखील जर आपण जीवात्म्याच्या दुर्धर व्याधींचे निवारण करण्याकरिता या मनुष्य शरीराचा सदुपयोग करणार नाहीं तर प्रवाहपतिता-प्रमाणे अनंतकाळपर्यंत असेच भ्रमत राहणार आहोत.

आपण किती हि उपाय केले व कसेहि प्रयत्न केले तरी कृपामय भगवंताच्या कृपेशिवाय या दुर्धर व्याधी पासून आपली सुटका होणे अगदी अशक्य आहे आणि प्रभूची कृपा तर प्रभूच्या उपासनेशिवाय प्राप्त होऊं शकत नहीं म्हणून दैनिक उपासनेची विधी या ग्रंथांत श्री. संत सत्यप्रेमी यांनी सोप्या व सरळ भाषेंत शास्त्रशुद्ध अशी लिहिलेली आहे.

पण, हे विसरता कामा नये की, बालहट्ट, स्त्रीहट्ट, वृद्धहट्ट आणि राजहट्ट हे चारही प्रकारचे हट्ट म्हणजे आग्रह; आणि मुलावरील आईचे

प्रेम, पतीवरील सतीचे प्रेम, विषयावरील विषयीचे प्रेम आणि धनावरील कृपणाचे प्रेम हे चारहि प्रकारचे प्रेम एकवटून जेव्हां उपासना होईल तेव्हांच प्रभूची कृपा होणे शक्य आहे ! एरव्ही नाहीं.

मनश्चक्षुसमोर भगवंताची परमसुन्दर मंगलमय 'मूर्ति', विचारांत परमेश्वर-अवताराच्या पावनप्रद 'लीळा' व 'चेष्टा' आणि वाणींत भगवंताचे परमपवित्र अठरा अक्षरी 'नाम', अशा चतुर्विध स्मरणासह, आजन्म प्रेमाग्रहपूर्वक, उपासना प्रत्येकांना करता यावी, या उद्देशानेच हा ग्रंथ लिहिला व प्रसिद्ध करण्यांत आला होता; तो उद्देश अल्पावधीत मागील दोन आवृत्या संपल्या यावरून बहु-अंशी सफल होत असल्याची सुचिन्हें दिसत आहेत.

लेखकांनी हा ग्रंथ पुन: तपासून अनेक ठिकाणी विषयांत योग्य बदल केला असून शेवटी दोन प्रकरणें नवीन जोडली आहेत.

कागद, छपाई, बांधणी, पोस्टेज, रेल्वे भाडे इत्यादि सर्व बाबतींत झालेल्या महागाईमुळे किंमत वाढवावी लागली; ती देखील ग्रंथाचे अंतरंग व बाह्यांग सजविण्याकरिताच, हे सूज्ञ वाचक ग्रंथ पाहून ओळखतीलच.

या ग्रंथाची ही तिसरी आवृत्ति काढण्याचा सुयोग ज्या उपासकांच्या उदाराश्रयामुळे आला त्या सर्वांचे आम्ही अंत:करणपूर्वक आभारी आहोत.

प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या दोन आवृत्तींचे जसे आपण स्वागत केले, तसेच या तिसऱ्या आवृत्तीचे देखील स्वागत व्हावे, ही नम्र प्रार्थना.

वर्षप्रतिपदा, शके १८८३. कृ. मु. महानुभाव

**

शुद्धांत: करणाने सदैव

भगवंताची उपासना करणाऱ्या

उपासकांच्या करकमळी

या ग्रंथाची ही तृतीयावृत्ति

सादर समर्पण.

— लेखक —

**

# दोन शब्द

## ( द्वितीयावृत्ति )

"महानुभाव दैनिक उपासना" हा ग्रन्थ श्री ज्ञानेन्द्रदादा उर्फ महंत संन्यासी महानुभाव यांनी शके १८७५ च्या शेवटी प्रकाशित केला होता तो आता शके १८७७ च्या प्रारम्भी म्हणजे सव्वा वर्षातच पुनः प्रसिद्ध करण्याचा सुयोग येणे ही महानुभावीय वाङमयांत अभूतपूर्व घटना होय. यावरुन या ग्रंथाची लोकप्रियता जशी दिसून येते तशी त्याची किती आवश्यकता होती हे देखील कळून येत आहे.

महानुभावीय संपूर्ण वाङमय भगवंताची उपासना व आराधना कशी करावी या एका विषया भोवतीच विस्तारलेले आहे. कारण, मानवी जीवनाचे परमोच्च उद्दीष्ट जे परमेश्वरपद ते मिळविण्यास उपासना हे एकच साधन आहे. हे साधन शास्त्रशुद्ध व विधीपूर्वक आचरले गेले तरच मानवी अंतःकरणाची अंतर्बाह्य शुद्धता होऊन ते परमेश्वर प्राप्तीस योग्य होऊ शकेल. पण महानुभावीय वाङमय सांकेतिक लिपीत जुन्या पद्धतीने लिहिलेले असून ते सर्वसाधारण जनतेस गुरुशिवाय समजणे अशक्य होते ते श्री संत सत्यप्रेमी यांनी आधुनिक पद्धतीने प्रचलित मराठी भाषेत शास्त्रशुद्ध लिहून सर्वास सहज सुलभ समजेल अशी भाविक जनांची निकडीची आवश्यकता पूर्ता केली आहे. या परनिष्ठ सर्वोपकारी कृत्याबद्दल जे त्यांना पारलौकिक प्रभूची प्रसन्नता मिळणार आहे तिच्या सोबत सर्व भाविकजनाचे अंतःकरणपूर्वक धन्यवाद देखील राहतील.

पहिल्या आवृत्तीत राहिलेले मुद्रणविषयक दोष या आवृत्तीत दुरुस्त करण्यांत आले असून विषयानुसार टाईप देखील जाड वापरला आहे. शिवाय लेखकांनी हा सर्व ग्रंथ आद्योपांत वाचून त्यांत आश्यक फेरफार केले आहेत व ही सर्वांग सुंदर दुसरी आवृत्ति जनतेस सादर करण्यांत येत आहे.

लेखकांनी हा ग्रंथ प्रकाशित करण्याची अमोल सेवा मजकडे सोपविली याबद्दल मी त्यांचा अंतःकरणपूर्वक आभारी आहे.

श्रीचक्रधर जयंति
शके १८७७

कृ. मु. महानुभाव
श्रीकृष्णाश्रम अमरावती

# चक्रेश मंत्र ध्यावा



जीवास रक्षण्याला । चक्रेश मंत्र ध्यावा ॥ धृ ॥

हा मंत्र ज्यामुखांत । तो धन्य या जगांत ॥
आत्मोन्नति कराया । चक्रेश मंत्र ध्यावा ॥ १ ॥

भवसागरामधून । तरण्यास हीच नांव ॥
कैवल्य सूख घेण्या । चक्रेश मंत्र ध्यावा ॥ २ ॥

सर्वज्ञ सर्व व्यापी । अव्यक्त ब्रह्म नाम ॥
अनंत शक्तियुक्त । चक्रेश मंत्र ध्यावा ॥ ३ ॥

गीतेंत ॐ नाम । वैदिक ते सकाम ॥
निष्कामता कराया । चक्रेश मंत्र ध्यावा ॥ ४ ॥

अनेक मंत्र असती । सुख नित्य नाहीं तेथें ॥
म्हणुनी म्हणे वसंत । चक्रेश मंत्र ध्यावा ॥ ५ ॥

****

# श्री गुरुमालिकेचे अभंग

परब्रह्म गुरु सकळ जगाचा ॥ हंस हा तयाचा अवतार ॥
हंस देवरायें सनका बोधिलें ॥ तेंच रूप आलें कृष्णमाजी ॥
ऐसें भागवतीं उद्धवा बोधिलें ॥ म्हणूनी साधिलें कृष्णनाम ॥
स्वामी चक्रधरें महिंद्र व्यासास ॥ केला उपदेश कृष्णनामें ॥
ऐसा हा संकेत जाणोनीया घ्यावा ॥ वसंताच्या जीवा निश्चय हा ॥

* * *

कल्युगामाजी आमुच्या मार्गास ॥ दत्तात्रेय खास आदिगुरु ॥
दत्तात्रेय बोधी चक्रपाणी देव ॥ गोविंदाचा भाव जयावरी ॥
गोविंद प्रभूने चक्रधरा प्रति ॥ दिली ज्ञानवृत्ति निजकार्या ॥
ऐसे अवतार परंपरा गुरु ॥ संसारासीं तारु दास म्हणे ॥

* * *

स्वामी चक्रधरें नागदेवाचार्य ॥ आम्हा गुरुवर्य स्थापिला हा ॥
नागदेवा पुढे परंपरा गुरु ॥ औपाध्याचा तरु वाढला से ॥
तया वंशीं झाला संत हरिराज ॥ तेणे दत्तराज बोधीयला ॥
दत्तराज बोधी गोविंद श्रीकृष्ण ॥ उर्फ जयत्कर्ण माझे गुरु ॥
दासासी पावन केलें आत्मबोधें ॥ घेई सुखसाध्य वसंत हा ॥



महंत श्री जयत्कर्णाचार्य कृत

# पंचपदी भजनाचे अभंग

भजन

॥ जय श्री दत्ता अवधूता ॥ पतीतपावन अत्रिसुता ॥

*          *          *          *          *

॥ दत्त दिगंबर दत्त । जय जय । दत्त दिगंबर दत्त ॥

रूपाचा अभंग

रुप पाहूं प्रेमे डोळा ॥ सर्व सुखाचा सोहळा ॥
तो हा दत्तराज गाऊं ॥ भक्तिभावें फुलें वाहूं ॥
आत्म-अनुभवे जाण ॥ रुप स्वयंभू निर्गुण ॥
दास म्हणे दिगंबरा ॥ चरणीं ठाव देई पुरा ॥

भजन

॥ जय जय कृष्णा परहंसा । अर्जुन सनका उपदेशा ॥

*          *          *          *          *

॥ यदुपति यादव मेघश्याम ॥ पतीतपावन श्री भगवान ॥

अभंग

हंस दत्तात्रेय कृष्ण चक्रधर । उभय दृश्य चार चहुंयुगीं ॥
गोविंद हा पर-अवतारभाव । चक्रपाणीदेव अवर हा ॥
ऐसे अवतार घ्यावे ओळखोनी । उगा ताणाताणी करूं नका ॥
दास म्हणे देवा केला मी निश्चय । सोडिनाते पाय तुझे आता ॥

भजन

॥ जय जय गोविंद, श्री प्रभु गोविंद ॥

## अभंग

गोविंद गोविंद ज्याचें वाणी छंद । त्यासी प्रेमानंद प्राप्त होई ॥
चैतन्यासी ज्याचें रज हो दुर्लभ । झाले ते सुलभ संतासी या ॥
ऋद्धिपूर वंध चार कोस भूमि । पवित्रता तुम्ही जाणा सत्य ॥
दास म्हणे जेथे प्रभू सेवास्थान । घाला लोटांगण भक्तिभावें ॥

*　　*　　*　　*　　*

धन्य क्षेत्र ऋद्धपूर । सर्व संतांचें माहेर ॥
चैत्र आषाढीची यात्रा । चला जाऊं पुण्यक्षेत्रा ॥
प्रभूमूर्ति दृष्टि पाहू । लाभ दर्शनाचा घेऊं ॥
दास म्हणे श्रीगोविंदा । तुझ्या द्वारी देई वंदा ॥

*　　*　　*　　*　　*

आणिक तो देव नाहीं मी जाणिला । हृदयीं ठसविला चक्रधर ॥
म्हणूनी तू देई दासासी जवळीक । नेणे तें आणिक सुख जगीं ॥
प्राणाचा संकल्प केला ऐशापरी । तुजविण संसारी नाहीं कांहीं ॥
दास म्हणे नको दुराव सेवका । पावशी भाविका ब्रिद तुझे ॥

## भजन

॥ चक्रपाणी श्रीगोविंदा । पावन करि तूं आनंदा ॥

## अभंग

स्थान प्रसादासी वंदा मनोभावे । भजा पूजा जिवे ज्ञानियासी ॥
निकी वास झाली नाम उच्चारिता । तयाची योग्यता श्रेष्ठ जाना ॥
देव आठवावा एकांती लोकांती । तेणे जीवाशांति मिळे पूर्ण ॥
विकार विकल्प करोनिया शून्य । व्हावे जगी धन्य दास म्हणे ॥

## भजन

॥ जय परब्रह्म चक्रधरा । नागदेव-वर दातारा ॥
॥ जय हरिपाळा चक्रधरा । जय हरिपाळा चक्रधरा ॥

## अभंग

हेंचि दान देगा देवा । घडो नित तुझी सेवा ॥
प्रेमानंदे तुज गाऊं । बुद्धि तुझे पायीं राहो ॥
नको येराचा विटाळ । पुरवावी माझी आळ ॥
तुझ्या दारीचा मी श्वान । नको जगीं माझा मान ॥
दास गोविंदासी देई । ठाव तुझ्या प्रेमळ पायीं ॥

## भजन

दत्तराज माऊली, श्रीकृष्ण माऊली, चक्रधर ॥

## प्रसादाचा अभंग

ब्रह्म निरुपण ताटी । शांतिरस वोणे वाटी ॥१॥
तोचि पुरोडांश घेईन । पाहे प्रसादाची खुण ॥२॥
तत्वबोधाचें ग्रहण । तेचि संताचें भोजन ॥३॥
दास म्हणे देई शित । तेथे लागे माझे चित्त ॥४॥

## काल्याचा अभंग

मुलेबाळें मेळविली । सिदोरी ती शुद्ध केली ॥
काला करोनि जेविला । तेणें सतुष्ट जाहाला ॥
ऐसे चक्रधरें केलें । भक्तिप्रेम स्विकारिलें ॥
दास म्हणे गोपी राजा । नमस्कार घ्यावा माझा ॥

## आरती

आरती ब्रह्मरुपा ॥ चक्रधर स्वरुपा ॥ धृ ॥

तुझे लागले ध्यान ॥ करोनि स्थिर मन ॥ हृदयीं साठविले ॥
परमानंदरुपा ॥ चक्रधर० आरती ॥१॥

ज्ञान प्रेमासि दिले ॥ जीवासी उद्धारले ॥ कैवल्यसुख दिले ॥
येथेच केली कृपा ॥ चक्रधर ॥२॥

देवादिका नकळे ॥ मायादि झाके डोळे ॥ तेथ मानव भोळे ॥
पाहाति पररुपा ॥ चक्रधर ॥३॥

नागदेवा स्थापून ॥ करीं रुपासमान ॥ प्रगटी ब्रह्मज्ञान ॥
जगजेठी अमूपा ॥ चक्रधर ॥४॥

दास चरणी लोळे ठेवोनि निजभाळ ॥ मागणे हेंचि देवा ॥
देई शुद्ध स्वरुपा ॥ चक्रधर ॥५॥

—**—

श्री गोपाळकृष्ण, महाराज .... की जय !

श्री दत्तात्रेय, महाराज .... की जय !

श्री चक्रपाणी, महाराज .... की जय !

श्री गोविंदप्रभु, महाराज .... की जय !

श्री चक्रधर, महाराज .... की जय !

॥ सत्य सनातन महात्म धर्म की जय ॥



* ॐ पर श्रीचक्रधराय नमः *

# —०: दैनिक उपासना :०—

## प्रार्थना



हे सच्चिदानंद श्री चांगदेवा ! ।
अव्यक्त सर्वज्ञ शुद्ध स्वभावा ! ॥
हे चित्परा ! शक्तियुक्ता ! अनंता ! ।
चक्रेश्वरा ! तू पद दे वसंता ॥ १ ॥

त्वमेव माता च पिता त्वमेव ।। त्वमेव बंधूश्च सखा त्वमेव ॥
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव ।। त्वमेव सर्वं मम देवदेव ।।२।।

स्वामिया ! तू दयाळु मयाळु कृपाळु कनवाळु अनाथाचा नाथ इत्यादि सद्गुण ऐश्वर्यसंपन्न आहेस.

श्रीचक्रधरराया ! मी विकार विकल्पिया, हिंसक गहाळदोषी निमित्तदोषी, राजसी, तामसी, गुरुद्रोही, मार्गद्रोही इत्यादि अनंत अपराधी आहे तरी कृपा करोनी दासासी क्षमा करावी.

स्वर्ग नर्क कर्मभूमि मोक्ष या चतुर्विध कर्मफलादि देवताचक्रापासूनि सोडवावें व तुझिया शुद्ध, बुद्ध, नित्यमुक्त, आनंदघन, कैवल्यानंद स्वरूपाचिया नित्यसंबंधासी पावन करावें जी स्वामिया !

मार्गचालक श्री दत्तात्रेयप्रभूस व सर्वज्ञ श्रीचक्रधरस्वामीस तथा त्रिगुणातीत गुणधर्मयुक्त आनंदरूप अव्यक्त ईश्वरास दंडवत.

स्थान, प्रसाद, भिक्षुक, वासनीक या चारी साधनास, चारी ज्ञानियास आठाभक्तास व सकळ गुरुकुळ परमार्गासी माझा नमस्कार.

पुत्रं विशाळदेवस्य नित्यमुक्तिप्रदायकम् ॥
माळिनीपरमानंदम् वंदे चक्रधरम् विभूम् ॥

॥ अथ विशेष नमस्कारवचने ॥

संबंध व्यक्त: व्यक्ते संबंधी अव्यक्त प्रसन्नता परमेश्वरु निक्षेपीति मग आपला संबंधु देति: म्हणौनि संबंधु वंद्य ॥ १ ॥

परमेश्वरभज्य संबंध वंद्य ॥ वस्तुसंबंधे शक्तिनिक्षेप ॥ २ ॥

वस्तुसंबंधे जडा अजडा भले ॥ ३ ॥

येथिचिया संबंधा गेले तेतुले ओटे गोटे आदिकरौनि तुम्हा नमस्करणीय कीगा, मा येसनी देमती कैसी डावलली ॥४॥

इत्यादि वचनाचेनि प्रमाणे कृपामाउली सह ईश्वराच्या सेवासंबंधासी दंडवत; माझा धर्म, स्थानापासून किंवा नामापासून तूंच सिद्धीस नेइजे स्वामिया !

(सूचना :- ईश्वरीं अवताराचा संबंध ज्या ज्या वस्तूस प्रसन्न भावनेने झाला असेल त्या त्या वस्तूस ती ती प्रसन्नतेची लिळा आठवून भक्तियुक्त नमस्कार करावा. त्यामुळे योग्यता व दक्षता प्राप्त होते. त्या जडवस्तूस ईश्वर कल्पूं नये कारण, जडापेक्षा भक्त श्रेष्ठ त्याहि पेक्षा ईश्वर श्रेष्ठ. )

### अथ प्रसाद नमस्कार विधिवाक्य

सारंगपंडितातें सर्वज्ञें म्हणतिले प्रसाद तो काई ऐसा ! देव दे तो प्रसाद की, एथोनि प्रसन्न होवूनि दिजे तो प्रसाद की. जैसे इंद्रभट्टाते "श्रीप्रभुचिया ठायाहुनि सर्वज्ञाते प्रसाद दुटी आणिलीती."

सर्वज्ञें म्हणतिले इंद्रों । हे तुमते देवपूजा असे कीं. म्हणोनि प्रसाद दिधला. तरी एथ एक फूल वाहिजे. हे देखिले तैसे आठविजे. एथ नमस्कार किजें. अतियत्न किजे,. सकृत सेविजे. भट्टोबासी पुसिले प्रसाद सेवे तव काइ होय ? सर्वज्ञे म्हणतिले विधी करितां विधी स्फुरे, विधी अविध परिहरे, प्रसाद सेवे तव पुरुष धर्मीं दक्ष होय. ईश्वरी आर्ति उपजे. विघ्नोपशांति होय. देव साह्याते करी, ऐसिया भावें जेतुकी प्रसादरूप वस्तु तयासी माझा नमस्कार.

## ॥ अथ उपहार भोजन विधिवाक्य ॥

मज अपवित्राते पवित्र करोनि माझी क्रिया स्विकारांत दयात्री. विकल्पित राजस तामस स्थान तथा अन्न याते कृपावलोकन करोनि पवित्र करावेजी स्वामिया !

सकळही देवाचें, देव देईल तें माझें. सर्व कर्मधर्म श्रीचक्रधरार्पण.

**सूचनाः**—विशेष किंवा स्थान यांच्या समोर अन्नाने भरलेलें पात्र आणावें व वरील वाक्य हात जोडून म्हणावें व पांच ग्रास मोडावे व पात्राभोवती पाण्याने संकल्प सोडावा. साष्टांग पांच दंडवत घालावे व पुनः हस्तोदक सोडून पात्र उचलावें. तसेंच माता पिता गुरु. वयोवृद्ध किंवा अभ्यागत यांना भोजन घालावें आणि दीन दुबळा पशु, प्राणी भोजनसमयी उपवासी असता कामा नये. त्यांना आहाराचा उपयोग करून भोजन करावें. स्वगृही किवा परघरी भोजनपात्र आपल्या समोर

ठेवल्यावर वरील विधिवाक्य म्हणत पंच ग्रास मोडावे. पाण्याचा संकल्प सोडून दोन्ही हात जोडून 'दंडवत' म्हणावे व सर्वांबरोबर ईश्वरनामस्मरण करीत भोजन करावें !

## अथ अतिथिसत्कार विधिवाक्य

१ भ्रमत भ्रमत भेट कां अपजौन भेट २ एकमेका भेटलिया हे भेटलियाचा पाड जाय, ३ एक देव एक धर्म तयाची परमप्रीति किजे, ४ तुम्ही अच्युतगोत्रियु कीगा ५ तुम्हा परस्परे परमप्रीति व्हावी कोगा, ६ ज्ञाता विरक्ताचा संग किजे, ७ उजळलेयाचेंन संगे मैळला उजळे, ८ येथिचिया संबंधाचिया संबंधा जाईजे मग म्हणे तो किजे, ९ देव दुर्लभ कां देवाते आठविता दुर्लभ, म्हणौन साधुसंत दुर्लभाचें दुर्लभ इत्यादि श्रीचक्रधरस्वामीने उपदेशिलेली वचनें आहेत येथिचा भिक्षुक वासनीक नामधारक साधुसंत भेटता देव भेटला ऐसा संतोष मानून हृदयांत वरील नऊ सूत्र आठवीत भेटावें परन्तु त्या जीवावर परमेश्वर बुद्धि येऊं देऊं नये.

**सूचनाः**—भिक्षुक वासनीक सत अतिथी किंवा आमंत्रित आपल्या स्थळी येतांच आपण सामोरे जाऊन अनन्यतापूर्वक दंडवत् करावा. नंतर पायप्रक्षालनार्थ पाणी द्यावें आणि बसण्यास यथाधिकारें यथाशक्ति आसन अंथरावें. नंतर उभे राहून नारळ, सुपारी, फूल, यथाशक्ति पदार्थ साहित्य अभ्यागताच्या हातांत देऊन प्रेमालिंगने पुरुषांनी पुरुषास व स्त्रियांनी स्त्रियांस भेट द्यावी व नमस्कार करून क्षेमवार्ता विचारावी व आपलीहि सांगावी. श्रमनिवृत्ति किजे" या वचनाज्ञेनुसार सर्वांगासह

पादसेवा करावी. उदकभोजनग्रहणार्थ आमंत्रण दंडवत सांष्टांग घालावेत. पाण्याने संकल्प श्रीचक्रधरार्पण म्हणून सोडावा. तसेंच संकल्प दंडवत फूलदान पूजन भोजन समयीं करावे. कारण :-"ज्ञान भज्य होय" असें सूत्र आहे. "ज्ञानवृद्ध तो सर्वत्र पूज्य" आहे. प्रेमालिंगनाचे वेळीं वरील विधिवाक्य अंतःकरणांत स्मरावें.)

### अथ अन्नदान-द्रव्यदानविधि

'दातव्यमितियद्दानं दीयते नुपकारिणे' या निर्हेतुक बुद्धीने दान द्यावेः 'अन्नदान तें उत्तम आहे' 'ब्रह्मार्पणं ब्रह्महविः' या भावनेनें श्रीचक्रधरार्पण म्हणून भोजनसमयीं ज्ञानिया भक्ताच्या हातावर पाण्याने संकल्प सोडावा व पूजाविधि करून दक्षणा द्यावी व दंडवत घालावे.

### अथ फूल वाहणें विधि

ज्ञानमय श्रद्धेच्या सुगंधाने युक्त असलेले हृदयपुष्प व ईश्वरीय नामोच्चारास जिव्हापत्र, ज्ञानेंद्रिययुक्त मस्तक हेंच श्रीफळ व मानसिक संकल्पाचे पाणी हें अंतरसाधन ईश्वरास अर्पावे आणि बाह्य संस्कार म्हणून पान, फूल, फळ, पाणी ईश्वरार्पण बुद्धीने स्थानविशेष साधुसन्तास अर्पावें. 'पत्र पुष्पं फलं तोयं यो ; मे भक्त्या प्रयच्छति, या मंत्राधारे यथाशक्ति करावे.

### अथ धूपविधि

"धूपायने परम सुन्दर दिव्यमंता । अंगार ते घालुनि पुष्पमंते"

( ध्यानामृत ) हें वाक्य म्हणून अग्नीत ऊद, ऊदबत्ती, चन्दन, अर्गजा, अगर, तगर, तूप हे यज्ञरूप बाह्य आदर्श म्हणून टाकावे व स्थानविशेष साधुसंतास सुगंध द्यावा, परंतु अंतर साधन ज्ञानाग्नींत सर्व कर्म ऊदरूपाने जाळून टाकण्याच्या हेतूने ईश्वरास प्रार्थनापूर्वक अर्पावे.

### दीपारती ओवाळण्याची विधि

जयतु मंगल मंगला ! परम मंगल रूपा ! सुन्दर नागरा !
पतितपावना ! अव्यक्ता ! अनंता ! सच्चिदानंद रूपा !
परमेश्वरा ! नित्यमुक्तिदायका ! चैतन्य परात्परा !
यति मुनि वेषधारका ! श्रीचक्रधरा ! शरणागता वज्रपिंजरा !
तूं आर्तदानी ! अनिमित्त बंधु ! जीवोध्दारण व्यसनिया !
तुज पंचप्राणारती ओवाळितों तरी कृपादिगुणांकडून
स्वीकारावेजी स्वामिया !

मज सेवकासी सन्निधान स्थित करोनि कैवल्यानन्द ज्योतीचा सोलिव आनन्द द्यावाजी स्वामिया !

जयतु मंगल मंगला ! परम मंगल रूपा ! परमेश्वरा ! श्रीचक्रधरा !

(सूचना :- दीपारती ओवाळते समयीं हृदयांत निराकार परमेश्वराचे गुणधर्म व शक्तिसह साकार अवतारांचें नाम लीळा मूर्ति स्मरून ध्यानांत आणावें. ज्या दिशेस जीं स्थाने असतील त्या स्थानांचीं चरित्रें त्या समयीं आठवावीं. जसें पंचाळेश्वर, माहोर, गोकुळ, मथुरा, द्वारका, फलटण, ऋद्धिपूर, उभय गोदावरीतिरीं डोमेग्राम इत्यादि. तसेच प्रसादगुरु आचार्य, ज्ञाते भक्त यांचेहि गुणोपकार स्मरून दीपारती ओवाळावीं.)

# परमेश्वर—नामार्थ बोध

**श्री चक्रधर राया गोसावियाचे चरण शरण ।**

**हा अठरा अक्षरीं मंत्र ध्यानयोगाच्या वेळी उच्चारावा.**

श्री — गुणधर्ममयकृपाब्जडाशक्ति व माया चेतनाशक्ति या शक्तिसह

चक्र — ज्ञानचक्र, जीव प्रपंचाचे श्रृष्टीचक्र, देवताचक्र

धर — धारण तथा पोषण करणारा.

राया — राजा.

गोसावि — व्यक्तरुप अनंत ब्रह्मांडाचा मालक. व जीवात्म्याचा स्वामी आहे.

याचे — त्या सर्व शक्तियुक्त परमेश्वराचे.

चरण — श्री चरण

शरण — ( आम्हा प्राणिमात्रांचे) रक्षण करणारे आहेत.

(सूचना :— "गोसाव्याचे" ऐवजी 'सर्वज्ञाचे'(सर्वज्ञ-सकळ जाणता) हा शब्द देखील परमेश्वर नामात पाठ भेदाने उच्चारला जातो कारण-

श्री चांगदेवराऊळ 'या नामांत सर्वज्ञाचे अथवा गोसाव्याचे या दोन्ही पैकी कोणताही एक शब्द उच्चारला तर १८ अक्षरे होतात परंतु श्रीकृष्ण चक्रवर्ति, श्रीदत्तात्रेयप्रभू, श्रीगुंडमराऊळ आणि श्रीचक्रधरराया याचारहि नामात वरील दोन्ही शब्दाने १८ अक्षरा ऐवजी सतराच अक्षरे होतात या करिता श्री चांगदेवराऊळ या नामात 'सर्वज्ञाचे' हा पाठ असणे उचित आहे आणि बाकीच्या चारही नामांत 'गोसाव्याचे' ऐवजी 'गोसावियाचे' हा शब्द असणे उचित आहे कारण त्यामुळें पांच ही नामात पूर्ण अठरा अक्षरे भरतात म्हणून दोन्ही पाठ आढळतात ते उचित आहेत.

( नामस्मरणास लागणाऱ्या वेळेचे कोष्टक ग्रंथाच्या शेवटी पहा )

# ध्यानासह नामस्मरण कसे करावे.

श्रीमद्भगवद्गीतेत बुद्धियोग, कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग, ध्यानयोग अशी अनेक योगांची नावें येतात आणि त्याविषयीं कांहीं विद्वानांची मतभिन्नताहि असलेली दिसून येते. कोणी ज्ञानयोग थोर आहे तर कोणी भक्तियोग थोर आहे, तर कोणी कर्म योग थोर आहे असे आपापल्यापरी प्रतिपादन करितात.

परंतु भगवान श्री चक्रधरस्वामींनी श्री. हंसप्रभूच्या तत्वज्ञानावर आपल्या तत्वज्ञानाचा पाया उभारला आहे. तेव्हां त्यांनी श्रेष्ठ-कनिष्ठाच्या वादाकडे लक्ष पुरवून निर्णय दिला आहे की, बुद्धिवांचून केलेली कर्मे अधर्मरुप बनतात, म्हणून बुद्धिच्या योगाची आवश्यकता आहे. परंतु त्यामुळे ती कर्मे निष्काम होत नाहीत, म्हणून ज्ञानाची आवश्यकता आहे. परंतु नुसत्या ज्ञानाने ईश्वरीय सुख मिळत नाही. ज्ञान हे नित्यानित्य सुखाची जाणीव करुन देणारे आहे. आनित्य सुख शरीराधारे कर्माने मिळते व नित्य सुख परमेश्वर भक्तीने मिळते म्हणून भक्तीची आवश्यकता आहे. भक्ति ध्यानाने पूर्ण होते म्हणून ईश्वराच्या ध्यानाची आवश्यकता आहे. म्हणजे ध्यान योगाने ऐहिक व पारमार्थिक सुखाचा लाभ होतो.

निष्काम कर्मयोग आणि संन्यास या दोन मार्गावरहि पक्षोपपक्ष आहेत. परंतु निष्काम बुद्धिवांचून संन्यास होईल काय आणि संन्यासा शिवाय मोक्ष मिळेल काय ? याचा वाचकांनीच विचार करावा.

हा ध्यानयोगाचा विचार असल्यामुळे आणि तो योग उभय योग्यांना पाहिजे म्हणून आम्ही त्या विषयांकडे किंचित् दृष्टि दिली.

ध्यानाला यमनियमाच्या आचाराने शरीर संयोगिक आत्मशुद्धि झाली पाहिजे, तरच ध्यानयोग साधेल.

'योग' हा शब्द 'युज्' धातूपासून बनला आहे. युज् म्हणजे जोडणे एक वस्तु दुसऱ्या वस्तूशी युक्त करणे, मिलाप तथा संबंध प्राप्त करणे असा या 'योग' शब्दाचा अर्थ आहे.

जीवात्मा व परमात्मा या दोन वस्तूमध्यें असलेला वियोग ज्या साधनांनी दूर होतो व उभयांचें ऐक्य घडते त्या साधनांस मोक्षसाधन किंवा योगसाधन म्हटलें आहे.

श्रीचक्रधरस्वामीने ज्ञानोक्त भक्तिकर्माला महत्त्व दिलें आहे. कारण केवळ कर्माने मोक्ष होत नाहीं मोक्ष हे कर्मफल नव्हे. तर ज्ञानाच्या साधनाने तें कर्म अकर्म बनते अकर्म हे फलाचीं अभिलाषा टाकल्याने होते. करीत असलेल्या ज्ञानमय कर्माने चित्त स्थिर होते. चित्त स्थिर झाल्यावांचून ध्यानधारणा होऊं शकत नाही कारण इंद्रियादिकांचा विकारधर्म व मनाचा विकल्पधर्म यांची शून्यता झाली पाहिजे व देहाच्या अष्टस्वभावाला मात्रायुक्त नियमन झालें पाहिजे आणि मानसिक, शारीरिक व वाचिक आंलबन टाकलें पाहिजे. या योगाने शारीरिक व आत्मिक शुद्धि होते नंतर ईश्वरस्मरण देहान्तपर्यंत झाले म्हणजे त्या जीवास परमेश्वर नित्यसुखाचा आनंद देतो.

म्हणून साधकाने परमेश्वरप्राप्त ज्ञानाचा अंगिकार करावा म्हणजे वैराग्य प्रात होऊन शारीरिक मोहापासून दूर होईल व साध्य जो ईश्वर त्याच्या भक्तीचे प्रेम उत्पन्न होईल त्या भक्तिमुळे ईश्वराच्या गुणधर्मशक्तियुक्त नामस्मरणांत चित्त विलीन करता येईल असे श्रीचक्रधर स्वामीने सूत्रपाठांत सांगितले आहे.

साधकाने प्रातःकाळी ३ वाजतां उठावें. आलस्यपरिहाराकरितां मुखमार्जन किंवा समयोचित स्नान करावे मग रज-तमरहित शुद्ध प्रदेशी वृक्ष-नदीतीरीविजन किंवा अरण्यांत एकांत स्थळी जाऊन, साधारण शुद्ध कापडाचे आसन आंथरावें. त्यावर वज्रासन, कूर्मासन अथवा पद्मासन घालून बसावे. मुख्यतः उत्तराभिमुख किंवा पूर्वाभिमुख असावे. समयोचित जी दिशा योग्य असेल ती ग्राह्य आहे. एकेरी शुद्ध कापडाचें पांघरूण तोंडावर घ्यावे. आचारसूत्र २४०-२४२, आ. मा. ४३-४९, आ. मा. २३७ या प्रमाणे ध्यान करण्यास बसावे.

आ. सूत्र ५६, आ. मा. सूत्र २१८, आ. मा. १३९ व १४० या चार सूत्राप्रमाणें पूर्वस्थितीं असावी. नंतर आ. सूत्र ११४ आ. मा. २४९ प्रमाणें ज्ञान ध्यान व भजन करावे.

ध्यानाच्या प्रारंभी बंध मुक्तीचा उपाय सांगणाऱ्या श्रीगुरुच्या मूर्तीचे गुणाचे ध्यान करून ज्ञानध्यान करावे.

प्रथम प्रपंचवस्तूचा विचार करावा की, प्रपंच हा त्रिगुणात्मक जड आहे. कारणरूप स्वयंसिद्ध अनादि क्रियारहित आहे आणि देवता शक्तिद्वारे कार्यरूप परिवर्तनशील अनित्य आहेत म्हणून स्वयं ईश्वरानंदास पात्र नाहीं व जीवालाहि त्यांच्या योगाने ईश्वरानंद मिळत नाहीं याकरितां या देहाच्या मोहांतून दूर होणें योग्य. कारण, देह हि या प्रपंचाचाच आहे.

देवता हा पदार्थ म्हणजे ईश्वराच्या आज्ञांकित अशा त्या अनादि शक्ति आहेत. स्वानंदी व एकदेशी आहेत. सृष्टीच्या कार्यास ईश्वराज्ञेनुसार सहायक आहेत. जीवार्जकानुसार जीवास आपला क्षुद्रानंद व कर्मफलोपभोग देऊ शकतात; परंतु नित्यमुक्तीचे सुख स्वयं घेण्यास अपात्र असल्यामुळें त्या जीवासहि देऊं शकत नाहींत. देहाच्या ठिकाणी इंद्रियादि अवयवांचे अधिष्ठान देवतासामर्थ्याचे आहे. म्हणून देवतेच्या साधन मोहापासून अंतःकरण दूर करावे.

जीव हा अविद्यायुक्त अनादि आहे. एकदेशी चेतन असल्यामुळें सुखदुःख ग्राहक सर्वाधिकारी आहे. स्वरूपतः नित्य व केवळ असून ईश्वरानंदास पात्र आहे. परंतु जीवात्म्यापासून अविद्यादोष दूर होत नाहीं तोपर्यन्त जीवास ईश्वरानंद मिळू शकत नाहीं.

या तीन वस्तूच्या विचारस्मरणाने त्या प्रपंच-देवता-जीव पदार्थातील गुणदोषांची जाणीव होईल व त्यामुळे पदार्थभोगविषयी वैराग्य उत्पन्न होईल. हे ज्ञानाचे कार्य आहे. नंतर परमेश्वराच्या निराकार स्वरूपासह साकार अवतारमूर्तींचे ध्यान करावे (आ. मालिका ४६-४७-४८-४९ व

१८६ हे सूत्र पहा)निर्वेद अनुताप अनुशोच आर्तपूर्वक नासिकाग्र दृष्टि ठेवून अंतःकरणापैकी अहंकाराच्या विकाराचा त्याग करावा. बुद्धीने अनंत शक्तियुक्त परमेश्वराचें गुणधर्मकार्यलक्षण पाहावें व आत्मस्वरूपी सर्वव्यापी अव्यक्त ईश्वराचें अस्तित्व निश्चित करावें. मनांत साकार मूर्तीचे अंतर्ध्यान करावें व चित्तानें प्रसन्नतेच्या लिळा आठवाव्या तसेंच वाचेने ईश्वरी नामांचा उच्चार करावा. या क्रियेने नाम, लिळा, मूर्ति चेष्टा या चतुर्विध स्मरणाचे रहस्य अनुभवास येतें.

शक्तिरहित अव्यक्त परमेश्वराचा आत्मिक निश्चय करण्याकरिता निर्वचन प्रकरणाचा पाठ करावा.

सर्व शक्तियुक्त परमेश्वराच्या गुणधर्मांचा बुद्धीने विचार करण्याकरिता महावाक्य प्रकरणाचा पाठ करावा.

साकार अवताराचें रहस्य लक्षांत घेण्याकरिता, पूर्वी प्रकरण व उद्धरण प्रकरणाचीं पहिली १२ सूत्रे पाठ करावींत. म्हणजे मूर्तीचें ध्यान हृदयांत करतां येईल. परंतु मूर्तिचें यथार्थ स्मरण सन्निधानांत असतांना होत असंते.

मूर्तीचें रूप, गुण, अवयव, अलंकार, वय यांचें लक्षणस्मरण करीतच ध्यानधारणा केली पाहिजे. कारण असन्निधानी भावना स्मरणच करता येते.

हें ध्यान-स्मरण किती वेळ करावें याचा विचार करूं. स्मरण, अनुस्मरण, सकृतस्मरण एक दोन वेळा अष्टौप्रहर स्मरण तें पूर्ण स्मरण यांत आसन, शयन, भोजन, व विधिकार्यक्रम यांचा समावेश होऊं शकतो. चार प्रहर तें अनुस्मरण. दोन प्रहर तें सकृत स्मरण. दोन वेळा म्हणजे एक प्रहर, एक वेळा म्हणजे अर्धप्रहर, १॥ तास, असे पांच प्रकारें उत्तरोत्तर सामान्य नियम आहेत. शेवटच्या काळाला रात्रीचा चौथा प्रहर योग्य आहे [आ. सूत्र २९ ते ३२ व ११४ पहा]

अभ्यासकाला प्रथम १॥ तासापासून अष्टौप्रहरपर्यंत स्मरण करण्याचें सांगितलें आहे. तो अनिर्वाच्य अशा सर्व सुखाला अनुभवतो.

मानसिक, वाचिक, शारीरिक, या त्रिविध मार्गाने ईश्वराचें ध्यान प्राप्त झाल्यावर परमेश्वराचा प्रीतिमय भक्तिमार्ग साध्य झाला असे म्हणतां येतें.

या ध्यानोच्या अभ्यासाने जीव, देवता व प्रपंचाचा त्याग होऊन हृदयांत परमेश्वर स्थिर होतो. कारण, आचारसूत्र ३३ मध्ये हेंच प्रतिपादिले आहे. म्हणून परमेश्वराचे ध्यान, नाम, मूर्ति, लिळा, चेष्टायुक्त करावें. असें आचारसूत्र २८ मध्यें आहे, तरी अवतारमूर्ति, नाम, लिळा, चेष्टा यां युक्त स्मरणाचा फायदा व वस्तुतः स्वरूप यांचा विचार करुं.

आचारसूत्र २७ मध्यें आहे कीं, जसें पाहिलें असेल तशा मूर्तीचे ध्यान करावें. परंतु पाहणें दोन प्रकारचें आहे. पहिलें, मूर्तिनिष्ठ व दुसरे, स्वरूपनिष्ठ. निराकाराचें मूर्तीचें देखणें ते चर्मचक्षूचे आहे व स्वरूपाचें देखणें तें ज्ञानचक्षूचें आहे. हें देखणें सन्निधानी व असन्निधानी सारखेंच आहे. परंतु साकार मूर्तीचे पाहणें तें दृष्टीचें असल्यामुळें अवतारांच्या विद्यमानांतच पाहणें घडेल. अविद्यमानी देखणें घडूं शकत नाहीं, असें आ. मा. सूत्र २४६ मध्यें आहे. पाहिलेली मूर्ति, मूर्ति-स्मरणांत येते परंतु ऐकलेली श्रीमूर्ति भावनास्मरणांत येते. यावरून हेंच निश्चित होते कीं, असन्निधानी मूर्तिस्मरण घडावें तसें घडत नाहीं. म्हणून आ. मा. सूत्र१०० चा हेतु स्वरूपनिष्ठतेकडे आहे असें गृहित धरणें क्रमप्राप्त आहे. कारण "भीतर सुन्दराचे सुन्दर" असें प्रभूचें वाक्य आहे.

"चैतन्यापर परमेश्वर तो देव" या सूत्रांत देव हा शब्द स्वरूपनिष्ठते विषयीं आहे. या सर्व सूत्रांचा इत्यर्थ असा आहे कीं, सर्वशक्तियुक्त निराकार परमेश्वराचें स्वरूप निश्चित करून वृद्धाचारानुसार भावनामय मूर्तिस्मरण करावें; कारण मूर्तिस्मरणाने चित्त एकाग्र होते व प्रेमतन्मयता निर्माण होते. त्यामुळें बाह्य विषयांचा विसर पडतो व ईश्वरीय स्वरूपाची निष्ठा जागृत होऊन साक्षात्कारी गुणधर्माचा आनंद मिळतो.

गर्भ पतित व द्‌वडणें या तीन प्रकारांनी ईश्वर अवतार धारण करितो. ही प्रवृत्ति निराकार व साकारापासून होते, हें कारणरूप आहे. तर नामाचा स्वीकार साकार मूर्तिधारी अवतार करतो, हें कार्यरूप आहे. म्हणून मूर्ति व नाम उभयान्वयी आहेत.

निराकार स्वरूपाचे नित्यनाम हें साकारीं निराकारीं असतेंच. परंतु मातापित्याकडून ठेविल्या गेलेल्या नामांचाहि अंगीकार करतात.

मूर्तिस्मरणाने प्रेमाचें भरते येऊन आवडीचा संचार होतो. नामाने साध्य-साधनाची योग्यता येते.

विचारसूत्र २६२ मध्यें स्थानापासून किंवा नामापासून लाभ होतो असे वर्णिले आहे. नामाचें महत्व अशा अनेक सूत्रातून गाईले आहे. "नामें वेध, नामें बोध, नामें अनुसरण, नामें स्मरण, नामें प्राप्ति- हें कार्य साकार–अनुषंगिक निराकाराचे आहे. "नाम सकळ निरोध परिहरि, पडतें आकाश धरी, वाजत वारा धरी, एतें विघ्न हरी, साक्षातें करी" हें कार्य निराकार अनुसंगिक साकाराचें आहे. म्हणून साकारा-पासून ढळों चळों नये व निराकाराचा निषेध करुं नये.

सर्व शक्तिरहित व युक्त निराकार परमेश्वर-स्वरुपासह, साकार मुर्तिचे नामस्मरण करावें. पण तें स्मरण लीळाचेष्टासह झाले पाहिजे. तेव्हां लिळा व चेष्टा कशा असतात तें पाहूं.

परमेश्वर–अवताराने केलेल्या लिळा व चेष्टा ह्या कारणरुप जें निराकारस्वरूप त्यापासून होतात. परंतु लिळा ह्या निर्हेतुक चेतन वस्तूशीं होतात तर चेष्टा सहेतुकपणे जडाशीं होत असतात. लिळा आठविल्याने कर्म अकर्म होते व चेष्टा आठविल्याने आचाराविषयीं दक्षता येते.

येथपर्यंत परमेश्वराचें ध्यान, मूर्ति, नाम, लिळा व चेष्टायुक्त करावें व तें पश्चात्प्रहरी एकांतस्थळीं करावें आणि अंतःकरण बाह्य विषयांपासून दूर सारावें, असें सांगण्यांत आलें आहे.

परंतु "असती परी" च्या शेवटच्या सूत्रांत 'देवता स्मरणे' व 'देवता हृदयासी ये' आणि 'परलोकीची देवता' इत्यादि वाक्यांनी देवता या नावांचा उल्लेख आला आहे आणि 'भोजनीं परमेश्वर व्हावा कीं गा', 'चैतन्यापर परमेश्वर' इत्यादि वाक्यांतून 'परमेश्वर' नामाचा उल्लेख आहे. तेव्हां या दोहोंतून संयुक्तिक व शास्त्रशुद्ध कोणते, याचा निर्णय होणें आवश्यक आहे. नाममीमांसा या लेखांतून तर स्पष्टीकरण होईलच परंतु समयानुसार येथें याचा खुलासा करावासा वाटतो.

परमेश्वरास 'देवता' नांव देतां येते; कारण सामान्याचें नांव थोरांत अंतर्भूत असते. परंतु सामान्यांत थोराचें अंतर्भूत असू शकत नाहीं. देवताप्रकरणांत, सर्वश्रेष्ठ देवता परमेश्वरच आहे; अनंत ब्रह्मांडांचें कार्य एका ब्रम्हांडातील ईश्वर-अवतार करुं शकत नाहीं तेव्हां या दृष्टीने अवतार देवता आहे. कारण सर्व ब्रम्हांडास निराकारच परमेश्वर आहे; परंतु या ब्रह्मांडांत अवतार परमेश्वर आहे.

जीव व प्रपंच या दोन पदार्थांचा अंतर्भाव देवतेंत आहे. संसरण प्रकरणांत (सूत्र १-२) मायास्वरूपांत तमोभागात अनन्त जीव आहेत व पांच भूतें, तीन गुण अष्ट भैरवस्वरुपांत आहेत. या जीव प्रपंचाच्या निराळा परमेश्वर आहे; आणि तो अनंतशक्ति ज्या देवता त्यांनी युक्त आ हे, असे महावाक्य-सूत्र १ मध्ये आहे.

स्मरणविधीला तर परमेश्वराचे गुण धर्म या सर्व शक्ति, जीव, देवता, प्रपंच या चारी वस्तूंच्या गुणधर्मांची आवश्यकता आहे. म्हणून मायापुराचा अंगीकार करतांना सर्वशक्तींचें युक्तत्व, जीवाचें मनुष्यत्व आणि जीवत्व, मूर्तित प्रपंचाचें अस्तित्व आणि ईश्वराचे परत्व हे सर्व पाहिजेत म्हणूनच अवताराच्या कार्यांत देवता शब्दाचा उपयोग केला आहे; परंतु त्या देवता शब्दांचा विपर्यास होऊं नये म्हणून परमेश्वर शब्दाचा उपयोग केला आहे.

पाहूं जाता, तुसत्या मूर्तांने देवताच ग्राह्य आहेत परंतु स्वरुपानें

परमेश्वर ग्राह्य आहे. मूर्ति व स्वरूप मिळून नाम आहे; म्हणूनच परमेश्वर स्वरूप मूर्तीत आहे. त्या मूर्तीचे ध्यान व नाम, लिळा व चेष्टा स्मरणीय आहेत.

"देवता" शब्दाने देवता-उपासकाला शंका करण्यास मार्ग होतो परंतु पूर्ण विचार केल्यास कळून येईल कीं, महानुभाव समाज एका शक्तीस परमेश्वर म्हणत नाहीं. तर हत्तीच्या दृष्टांतान्वयें सर्वशक्तियुक्त परमेश्वरासच मानतो. शक्तीला ईश्वर म्हणणें व कल्पित मूर्तीचे ध्यान करणें याने विकल्पदोष होतो, असें उपदेशिले आहे. तेव्हां 'देवता' शब्द साकार लक्षणाने ईश्वरास वापरला आहे. वस्तुतः परमेश्वराला शक्तिरूप अनेक नांवें आहेत, त्यांत हे नांव येऊं शकते. निःपातिक व स्वरुपनिष्ठ देवता हें नांव आनुषंगिक आहे. म्हणून नामोच्चारी देवता शब्द नाहीं, हें पंचनामांवरून कळते.

या पांच अवतारापैकी चालू अवतार श्रीचक्रधर अवतार आहे. तेव्हां त्यांच्या मूर्तीचे व नामाचे, लिळेचे व चेष्टेचे विचारवर्णनाकडे पाहूं.

भगवान् श्रीचक्रधरस्वामींच्या अवतारकार्याची रुपरेषा पाहूं लागल्यास महान विस्तीर्ण आहे. त्यांच्या उपदेशांत अध्यात्मज्ञानावर विशेष जोर दिलेला दिसत असला तरी भक्तीचा आचारच म्हणजे ध्यानयोगाचा चिंतनविधी ते भक्तांकडून विशेष करवून घेत असत. जीवभक्त ईश्वराचें ध्यान करतात आणि ईश्वर-अवतार सर्व जीवांचे हित चिंतन करितात. अशा कृपाळू देवाची मूर्ति व केलेल्या त्या लिळेचे भाव ध्यानांत आणू या.

निर्वचन, महावाक्य, पूर्वी व उद्धरणांतील पूर्व १२ सूत्रे या चार प्रकरणानुसार 'चैतन्या पर परमेश्वर तो देव श्रीचक्रधर' यांनी स्वीकारलेलें मायापुर त्या मूर्तीचा चांपेगौरवर्ण, राजचिन्हयुक्त तेजस सुकुमार कांति अशी आपादमस्तक श्रीमूर्ति, त्यामूर्तीचें वर्णन पुढीलप्रमाणें:-

"ध्वजवज्रांकुश चिन्हांकित श्रीचरणतळवे युक्त आंगोळिया, द्वितीयेच्या चंद्राकृति नखें, त्रिकोण गुल्फें, कर्दळीचिया गाभ्यापरि पोट-रिया, घणें पिटल्या ऐशा मांड्या, सुरत ओहरत जंघायुगळ, चवरस घनवटु बरवा नितंब प्रदेश. ब्रह्मचर्ययुक्त विश्वबीजावयव, यतिमुनिवेषें एकसुडा कटिप्रदेशी वेढिला असे, सखोल नाभी, शोभिवंत त्रिवळी, अनंत अपराध सामाये ऐसे सुलक्षण उदर, मृदु सरळ रोमावळी, उंच वक्षस्थळ, आजानु बाहू, सुन्डाकृति दंड, कमलापरि कोमल द्वयहस्त, सरळ आंगोळिया, बीजेच्या चंद्राकृति नखे, कंबुकंठसुरम्य अर्धचंद्राकृति हनुवटी, सुहास्य वदन, पोवळिया परि सुरंग कोमल ओठ, मोतियापरि दंतपंक्ति प्रभा, परागिरावर्णि जिव्हा, सुशोभित मिश्रु, सरळ नासापुट, आकर्ण विशाल कृपा लोचन, सुरेख भवया, डाव्या भवईवर कांदि, उंच कपोल, लंब कर्ण नितळ भाळप्रदेश, मनोहर श्रीमुगुट, त्या मुगुटीं सुडा वेढिला असे, २५ तथा २७ वर्षाभीतर वय दिसत असे"

"ऐशा सर्वांगसुंदर मायापुर श्रीमूर्तिमाजी निर्वचन महावाक्य प्रकरणानुसार निराकार परमेश्वराचें स्वरूप पूर्वा प्रकरणाप्रमाणें साकार अवतार भिंगाने आतील दीपकन्याये पहावे. जेणे सृष्टीमध्यें कलयुगी कर्मभूमिमाजी अवतरौनि जीवोद्धाराकारणें महाराष्ट्रांत गंगातिरी निवृतिधर्म संस्थापिला"

डोमेग्रामी श्रीचक्रधरस्वामी आसनी उपविष्ट असती. पद्मासनी बैसले असती, श्रीकंठी फुलांचा हार, मनगटीस फुलांचे हातसरे, भाळ-प्रदेशी केशरयुक्त चंदनाचा किंवा गोपिचंदनचा उर्ध्व पौंड्र टिळा रेखिला असे. श्रीमुखी त्रयोदशगुणी (विडा) तांबूळ असे. ऐशा प्रकारे कोण्या सदैव भक्ताने मोकळया पुष्पासह पूजा केली असे. तया अवसरी भक्तजन निरोपणश्रवणार्थ बैसले असती. तेथे माहीया पंडिताप्रति शास्त्रार्थीने अन्यथाज्ञानापासून निवृत्त करून सत्यज्ञान प्रदान केलें. ईश्वरवस्तूचां निर्देश व देवता व्यावृत्ति करून जीवाच्या बंध मुक्तीकरिता

ज्ञानोक्त ईश्वरदास्य व पांचावतार नाम उपदेशिलें. तैसे मज सेवकाते उपदेशावेजी स्वामिया !"

" अनंता जीवांसह मज पतिताते उद्धारावया भरवसपुराहूनि राज्योपभोगाचा त्याग केला. द्यूतक्रीडा आंगीकरोनी तयानिमित्य कमलाराणीसी अव्हेरिले. माता माल्हनीदेवी पिता विशाळदेव यांना रामयात्रेचें निमित्त दाखवून रुद्धपुरी श्रीगोविंदप्रभूपासून ज्ञानशक्तीचें कार्य करण्याकरिता आज्ञा घेतली. वैराग्यधारण करून सालबर्डी येथें मुक्ताबाईस पुरभजन घडवून प्रेमाधिकार दिला. पैठणी नागांबिकाबाईसी प्रेमभक्तीचा संचार केला व ब्रह्मांडाचे उद्धरणव्यसन स्वीकारिले. श्रीनागदेवाचे सप्तव्यसन त्यागविले व ज्ञान प्रेमासी योग्य केलें. कैवल्यपदाधिकार देऊन आचार्यत्व दिले."

"एसे अनंत जीवांसी उद्धारिलें, कर्मभूमिमध्ये युक्तमनुष्यदेही अधिकारानुरुप, ज्ञान तथा प्रेम देऊन उभय गंगातिरी अनंत लीळा केल्या व ब्रह्मविद्या उपदेशिली."

"महाराष्ट्रदेश किंवा देशाचा शेवट तथा गंगातीराची थोरी सांगून आचार विहिला. तया चैतन्याघर परमेश्वरा ! श्रीचक्रधरराया गोसवियाचे चरण शरण" या नामाने स्मरणध्यान करावें व वरील चरित्रभाव आठवावेत.

## परमेश्वर—अवतार—मिमांसा

या मानवी जगांत नाना विचाराचे लोक आहेत ते आपापल्या मतानुसार आपापला सिद्धांत व्यक्त करीत आहेत, तथापि आस्तिक व नास्तिक असे दोन पक्ष प्रचलित आहेत.

भौतिक-विज्ञानवादी, चार्वाक, जैन, बौद्ध हें चारी पक्ष नास्तिक आहेत. यांपैकी चार्वाक व विज्ञानवादी हे दोन्ही पूर्ण जडवादी आहेत म्हणून यांच्या मतें जीव, देवता ईश्वर वगैरे कांही नाही. पंचभूते— त्रिगुणात्मक जड प्रकृतीचा संयोग हाच जन्म; आणि वियोग हाच मृत्यू

आहे. जडांतच चेतनाची उत्पत्ती व क्रिया आहे असे ते मानतात म्हणून हे नास्तिक.

जैन, बौद्ध हे दोन्ही जड प्रकृति, जीव व त्यांचे कर्म यांचाचा संबंध जगताशी आहे असे मानतात तथापि बऱ्याच अंशी या दोन्ही पक्षांत मतभिन्नता आहे.

श्री शंकराचार्य रामानुजाचार्य, पंचाचार्य ( लिंगायत ) वारकरी. मुसलमान, ख्रिस्ती, मध्वाचार्य, महानुभाव, आर्यसमाजी इत्यादि ईश्वराचे अस्तित्व मानणारे आहेत. म्हणून हे सारे आस्तिक आहेत परंतु या साऱ्याच धर्मप्रवर्तकांच्या सिद्धांतांत एकता नाही. कोणी अद्वैत तर कोणी द्वैत, कोणी परमसिद्धांताद्वैत तर कोणी शक्तिविशिष्टाद्वैत ( मायावादी ) इत्यादि मताचे आहेत.

शांकरी, रामानुजी, लिंगायत, वारकरी, मुसलमान, खिस्ती हे थोडया थोडया फरकाने अद्वैतीच आहेत.

यांच्या मते ब्रह्मवस्तूशिवाय दुसरी वस्तूच नाही. दिसणारे जग परीणाम किंवा विवर्त ( भासमान ) रुपाने कल्पित आहे. जीव देवता प्रकृति ही सारी ब्रह्माची प्रतिबिंबें आहेत. या सिद्धांतांतच वरील पक्ष समाविष्ट आहेत. चेतनांत जडाची उत्पत्ति आहे असे ते मानतात.

मध्वाचार्यानुयायी, माहानुभाव, आर्यसमाजी हे पुर्ण द्वैतसिद्धांती आहेत. यांनी जीव प्रकृति ईश्वर हीं तिन्ही तत्त्वें स्वरुपतः अनादि आहेत, असे मानले आहे.

या आस्तिकांच्या सिद्धांतांत असलेल्या मतभिन्नतेपैकी द्वैत व अद्वैत हे दोन मुख्य पक्ष आहेत. उभय पक्षाच्या निर्णयाकरितां बरींच रणें माजली आहेत; हें वेद, पुराणे, षटशास्त्रे, उपनिषदे व अनेक आचार्यांचे तात्त्विक ग्रंथ अवलोकन केल्यास कळून येईल !

परंतु या साऱ्याच आस्तिकांचे नास्तिकांच्या तत्त्वज्ञानावर, वेळोवेळीं शास्त्रार्थ झालेले असून आपापली बाजू मांडण्याचा प्रयत्न उभयतांनी

केलेला आहे. तथापि ईश्वराचे अस्तित्व जगमान्य झाले आहे. या ईश्वरीय तत्त्वज्ञानाचा सिद्धांत सांगणाऱ्यापैकीं महानुभावांच्या आणि इतरांच्या विचारांत कुठे कुठे साम्य आहे ते पाहूं आणि विषमतेबद्दल थोडा विचार करूं.

प्रपंचाच्या अनादिपणाबद्दल चार्वाक, भौतिक-विज्ञानवादी, जैन, बौद्ध, माध्व, आर्य व महानुभाव यांचे एकमत आहे.

परमेश्वर अनादि, निराकार व सर्वशक्तिमान असल्याचें शांकरी-लिंगायत-माध्व-आर्य सर्वच ईश्वरास्तित्ववाद्यांचे व महानुभावांचे मतैक्य आहे.

जीवाच्या स्वतंत्र अनादिपणाबद्दल बौद्ध, जैन, मध्वाचार्य, आर्य व महानुभावाचे एकमत आहे.

प्रपंच, परमेश्वर आणि जीव या तीन पदार्थांबद्दल बऱ्याच अंशी निर्दिष्ट केलेल्या तत्त्ववेत्त्यांच्या विचारांशीं साम्य आहे; क्वचित् स्थळींच वैषम्य आहे. ही झाली स्थूल तुलना.

महानुभाव जीव, देवता, प्रपंच व परमेश्वर या चार वस्तु अनादि आहेत असे मानतात.

जीव अनेक, अनंत व एकदेशी आहेत. सर्वाधिकारी असल्यामुळे सुखदुःखांच्या कर्माला व भोगाला पात्र आहेत. परंतु साधनाविषयी परतंत्र आहेत. प्रपंचाच्या आश्रयावांचून कांहीच करतां येत नाही.

प्रपंच त्रिगुणात्मक जड असल्यामुळे स्वयं क्रिया करूं शकत नाही.

देवता दिव्यगुणयुक्त चेतन पण ईश्वराधीन आहेत आणि प्रकृतीच्या सृष्टीमय कार्यास सहायक आहेत. चैतन्य मायेपासून कर्मभूमिपर्यंत ८१ कोटी सव्वालाक्ष ९ देवता आहेत. माया सकल ब्रह्मांडाला व्यापून आहे परंतु विश्वरूपदेवतेपासून कर्मभूमिपर्यंतच्या देवता एका एका ब्रह्मांडांत आहेत. असे अनंत ब्रह्मांड आहेत.

परमेश्वर अगाध, निराकार, सर्वदेशी, सर्वज्ञ, सर्वाधार, सर्वशक्ति युक्त, सर्वात्माक, सर्वातीत, शुद्ध, बुद्ध, नित्यमुक्त, दयाळु, मयाळु, कृपाळु न्यायकरी, आनंदघन इत्यादि गुणधर्मांनी परिपूर्ण आहे. परंतु तो जीवोंद्धाराकरितां सौदार्य व कृपागुणाने सर्वदेशी असताहि एकदेशांत उत्पन्न होणाऱ्या कार्याने अवतार धारण करतो व जीवाला अधिकारानुसार ज्ञान देऊन आचारशुद्धिनंतर जीवाची अविद्या फेडून नित्यमुक्तीचें सुख देतो.

शक्तिरूप ज्या देवता व त्यांचें विग्रह आणि सृष्टीचें कार्य, परमेश्वराचें अवतार व ईश्वराकडून जीवास मिळणारी नित्यमुक्ति; या बाबतींत महानुभावांची मतभिन्नता आहे.

आता वर दर्शविलेल्या साम्य विचाराऐवजी मतभिन्नतेचें विवेचन करणें आवश्यक आहे; म्हणून यापुढे मतभिन्नतेच्या विचारसरणीपैकी देवता व परमेश्वराच्या मानवी अवतारांचे विवेचन प्रथम करणें इष्ट होय.

एकंदर सेश्वरवादी' परमेश्वर निराकार, सर्वज्ञ व सर्व-शक्तिमान आहे, असे मानतात. परंतु त्या परमेश्वराचे गुणधर्म, शक्तिरूप देवता, ज्ञान-विज्ञान, विग्रह आदि शक्ति यांचा संपूर्ण विचार कोणीच केलेला नाही; कारण "परमेश्वर सर्वशक्तिमान आहे एवढें जाणलें म्हणजे झाले" असा त्यांचा समज आहे. परन्तु ही समजूत अपूर्ण आहे. कारण, अवयव व अवयवी भिन्न भिन्न नाहींत. अवयवाचें कार्य सर्व देहांत असूं शकत नाहीं. ज्या त्या अवयवाचे कार्य ज्या त्या अवयवाकडूनच होऊ शकतें; मात्र अवयवरूप शक्तीचा अधिष्ठाता एकच असतो. त्याप्रमाणे ईश्वर हा एक असून त्याच्या आधीन शक्ति आहेत; तेव्हां शक्ति गुण–धर्मकार्याने भिन्न आहेत आणि चेतना व जडा असे शक्तीचे दोन भेद आहेत, कर्मभूमिते चैतन्य माया आदि देवता या चेतना शक्ति आहेत. गुण गुणीपासून भिन्न नसताहि गुणीचा गुण गुणीला

सोडून जाऊं शकतो. जो वस्तुगुण आपल्या अधिष्ठानाला सोडून जाऊं शकतो तो त्या अधिष्ठानाहून कांहीं प्रमाणांत भिन्न आहे असें मानावें लागतें; पण त्यामुळे त्याचें मूळचें अधिष्ठान नष्ट होते असे मात्र नाही. याप्रमाणे गुणरूप ज्ञान व कृपादि जडा शक्तींचा संबंध ईश्वराशी आहे. तथापि ज्ञान शक्तीचा स्वीकार जीवाला करता येतो.

गुणीचा स्वयं रंग हा गुणीपासून वेगळा होत नाही पण रंग दृष्टीला दिसतो. त्याप्रमाणेच धर्मरूप शक्तीचा संबंध ईश्वराशी आहे.

आत्मक-धर्म व अतीत धर्म हे दोन्ही धर्म, तसेच कर्तृत्वधर्म व साक्षित्वधर्म हे दोन्ही धर्म, परस्पर विरुद्ध आहेत; परंतु शक्ति भिन्नतेमुळें व कार्य भिन्नतेमुळें प्रत्येक धर्माच्या क्रिया नित्य चालू राहतात म्हणून विरुद्धपणा नष्ट होतो. या स्वरूपांग धर्मांचा स्विकार इतरांना करता येत नाहीं.

अनंत शक्तियुक्त परमेश्वर हा जीवांत प्रपंचात व देवतेंत आत्मकरूपाने व्यापलेला आहे; मग हे तिन्ही सर्वज्ञ व स्वयं कार्यकर्तें का नाहींत? देवतेचा निर्णय थोड्या वेळापुरता बाजूला सारला तरी, ज्या जीवजातीकरितां सृष्टीचे कार्य चालू आहे त्या जीवांतहि परमेश्वराचे स्वरुप व्यापून आहेच. मग तो नित्य सुखाला वंचित होऊन अविद्यायुक्त होतो व प्रकृतीच्या भोगानंदांत निमग्न होतो, हें काय म्हणून? तेथे हेंच कबूल करावें लागेल की, ईश्वराने आपली ज्ञानशक्ती जीवरूपांत प्रवेशित केली नाही. अतीत धर्माने ती अलिप्त ठेवली.

जेव्हां जीवाला भूतभजनाचीं क्रिया घडून ज्ञानाधिकार निष्पन्न होईल तेव्हां ईश्वर जीवास बोधरूप ज्ञानशक्ति प्रेरित करील. यावरून हे सिद्ध होते की सर्व देवता, सर्व धर्म, गुण-ज्ञान, विज्ञान या जडा व चेतना शक्तीं ईश्वर स्वरुपांत व्याप्त आहेत. परमेश्वराच्या प्रेरणे शिवाय शक्ति या स्वतंत्र काहींच करूं शकत नाहीत.

परमेश्वर शक्तिमान् आहे येथे 'मान्' हा शब्द युक्तते वाचक आहे. जसे, हा मनुष्य श्रीमान् आहे. मान् हे पद सहाय्यक आहे [illegible] युक्त

म्हणजे या सहित. येथे द्वितीय वस्तूचा बोध होतो. यावरूनहि देवतासह सर्वशक्ति भिन्न आहेत असे सिद्ध होते.

शक्तीचे कार्य मर्यादित आहे. गुणमर्यादेचा अंगीकार अमर्यादित वस्तूस असतो परंतु स्वरूपमर्यादेचा अंगीकार अमर्यादित वस्तूला करता येणे शक्य नाहीं.

जे कांही कार्य मर्यादायुक्त दिसत असतील तें कार्य शक्तिद्वारे केलेले आहे. कारण, परमेश्वररूप निर्विकार, निरभिमान व नित्ययुक्त आहे.

जडा व चेतना या दोन्ही शक्तींची कार्ये मनुष्यदेहाच्या इंद्रियांप्रमाणे आहेत कर्मेंद्रियें ही ज्ञानेंद्रियाधीन आहेत, कारण एक आंधळा तर दुसरा लंगडा आहे. ज्ञान डोळस आहे पण लंगडें आहे; कर्म आंधळा आहे पण हस्तपादयुक्त आहें. त्याचप्रमाणें चेतन्यादि कर्मभूमिपर्यंत ज्या देवताशक्ति चेतन आहेत, त्या कर्मेंद्रियासारख्या आहेत कारण दया, मया, कृपा, औदार्य, ज्ञान, विज्ञान या स्थिर आहेत पण ज्ञानेंद्रियाप्रमाणें कार्य केल्याशिवाय चेतना शक्तीचें कार्य चालू शकत नाहीं, म्हणून ज्ञानेंद्रियें जडा शक्ति आणि कर्मेंद्रियें चेतनाशक्ति आहेत.

नित्यत्व व्यापकत्वादि धर्मांनीं युक्त आणि गुण व देवता या सर्वशक्तीचे नियामक आनंदघन ईश्वररूप आहे परंतु तो स्व-स्वरूपाविषयीं स्वानंदी व स्वतंत्र आहे.

ईश्वर सर्वशक्तिमान आहें, म्हणून तो वाटेल तें वाटेल तसें आणि वाटेल त्या काळीं कांहीहि करूं शकत असेल असें नाहीं. जीव, देवता व प्रपंच या वस्तुंच्या गुणकर्म स्वभावाप्रमाणे व स्वशक्तीच्या न्यायाने होणारा योग्य तो उपयोग करतो.

या सर्व विवेचनावरून असें कळतें की, ईश्वर व शक्ती भिन्न आहेत. परंतु शक्ती स्वयंतंत्री नाहींत, त्या ईश्वराधीन आहेत. आतां या जडा व चेतना शक्तींचा उपयोग केव्हां व कुठे केला जातो, याचा थोडा विचार करूं.

सृष्टि या शब्दाचा रचना किंवा निर्माण असा अर्थं होतो, परंतु केव्हां निर्माण केले, तो काळ कळणें अशक्य आहे. कारण सृष्टिक्रमाला आरंभ होऊन दीर्घकाळ गेल्यामुळें, सृष्टीचा आदिकाळ कळणें कठीण झाले आहे.

मात्र ती केव्हां तरी उत्पन्न झाली हें निश्चित आहे. मग जी उत्पन्न झाली तिचा अंत होणारच ! पण अंत दोन प्रकारे होतो, एक संयोग–वियोगात्मक अंत व दुसरा कायमचा अंत. हे उत्पन्न होणाऱ्या वस्तूवर अवलंबून आहेत. सृष्टि ही आनंदीच्या चार पदार्थांच्या संयोगाने बनली आहे. तेव्हां येथे वियोगी अंत आहे. परंतु यांतहि दोन प्रकार आहेत सृष्टिप्रवाहक अंत म्हणजे संहार, याला प्रलय म्हणतात, हा अंत अनंता जीवांस नित्यमुक्ति मिळणार नाही त्या वेळेपर्यंत होत जाणार. अर्थात् होणें राहणें, जाणें हें रहाटगाडगें चालणार. परंतु सर्व जीवांना मोक्ष मिळणें म्हणजेच सृष्टीचा खराखुरा अंत होय.

या सृष्टीच्या कार्याला औदार्य, कृपा व सर्वज्ञत्व या ज्ञानेंद्रियगुणरूप जडा शक्तींच्या साह्याने परमेश्वराने जीवोद्धाराकरितां आरंभ केला आहे, आणि ऐश्वर्य व कर्तृत्व या धर्मांचा उपयोग केल्यामुळे सृष्टीचे नियम यथास्थित चालू आहेत. सृष्टिरचणयापूर्वी प्रपंच भैरवदेवतास्वरूपी स्थित होता आणि जीव मायास्वरुपी तमांत निमग्न होते. सच्चिदानंद परमेश्वर निराकार स्वस्वरूपीं स्वानंद मय सर्वकाळ आहेच.

ईश्वराच्या आनंदस्वरूपाचें सुख अनुभविण्यास जीवावांचून कोणीच अधिकारी नाहीं. जीवास सर्व ज्ञान झाल्यावांचून नित्यमुक्त–सुखाची जाणीव होत नाही. ज्ञान देण्याकरितां युक्त मनुष्यदेहाची आवश्यकता आहे. देह रचण्यास प्रपंचाची आवश्यकता आहे. प्रपंचास क्रियाशील करण्यास देवतेची आवश्यकता आहे.

जीवाच्या कर्मानुसार कर्मफळ भोगविण्याकरितां सुखरूप व दुःखरूप दोन व्यवस्था आहेत. या दोन्ही व्यवस्था व्यवस्थित ठेवण्याकरितां, म्हणजे जीवास सुख-दुःख भोगविण्याकरिता, ज्या चेतनाशक्तीचा उप-

योग केला आहे त्या देवता आहेत व कर्म करून सुखदुःख भोगणारा जीव आहे, आणि या सर्वांचा आधार केवळ निमित्तकारण परमेश्वर आहे, म्हणून जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर या चार पदर्थांच्या संयोगाने सृष्टीची उत्पत्ति झाली आहे.

निराकार परमेश्वराच्या अनंत शक्तिद्वारे सृष्टीचे कार्य चालतें मग साकाररूप अवताराचे कारण काय ? तसेंच सर्वदेशी वस्तु एकदेशी होणें आणि जीवाप्रमाणें कर्मोपभोगांत शरीरधारी बनणे हे विसंगत नाही काय ?

महानुभाव तत्वज्ञानांत ईश्वराचे सर्वव्यापकत्व कायम असून तो अवतारकार्य करतो आणि भोगातीतहि राहतो, हें पुढील विवेचनावरून कळून येईल.

परमेश्वर जगांत व्यापक असून अवतार धारण कसा करतो व कोण्या शक्तिच्या आधारे अवतरतो, याचा विचार करूं.

अवतार म्हणजे सर्वव्यापी अनंत ईश्वरस्वरूप एका देहांत आले आणि सर्व देश ईश्वरावांचून रिकामा झाला असें नसून, ईश्वर आपले स्वरूप आहे त्या स्थितीतच ठेवतो आणि शक्तिद्वारे अवताराचे कार्य करतो.

परमेश्वर सर्वव्यापी आहे पर जीवांत व स्त्रियांच्या गर्भाशयांत आणि शौचादि अमंगल व मंगल वस्तूत व्यापून आहे, परंतु अतीत धर्माने परमेश्वरास त्या मंगल व अमंगल वस्तूचा भोगरूप संबंधच येऊं शकत नाहीं.

त्याचप्रमाणे देहांत व्यापक असलेल्या ईश्वरस्वरूपाधारे औदार्य दया मया, कृपा, विज्ञान या शक्तिद्वारे अवताराचे कार्य केले जाते म्हणून अतीत धर्माने कर्माचे बंधन नाही व सर्व देशित्वांत कांहीच अडचण येत नाही.

परमेश्वर मायापुराचा स्वीकार करतात तो जिवांच्या कल्याण करिता

म्हणून पुरस्वीकारापासून तो पुरत्यागापर्यंत परमेश्वरावताराची प्रत्येक कृति जीवोद्धार करण्याकरिताच असते. परमेश्वर आयत्या देहांत अवतार धारण करतो म्हणजे प्रेतांत किंवा जीवाला दवडवून अथवा गर्भात प्रवेश करतो; तरी त्यांत जीवाच्या कल्याणाचाच हेतु असतो.

परमेश्वर स्वतः कर्म व कर्मफलातीत असल्यामुळे अवतार घेण्यास कर्माच्या फलाची आवश्यकता नाही. कारण, सृष्टीचे कार्य करते समयी ईश्वराने आपल्या पूर्वकर्माचे फळ म्हणून सृष्टी रचली काय? मुळीच नाही!

बरे, जीव स्वरूपांत असलेल्या परमेश्वराच्या व्यापक स्वरूपाधारे ईश्वराने आपले ज्ञान जीवास प्रेरित केले असे गृहीत धरले तर, तम स्वरूपातच ज्ञान देता आले असते, परन्तु तसें ईश्वराला करता आले नाही. कारण मनुष्य देहावांचून जीवाला ज्ञानाधिकार प्राप्त होत नाही ! तसेच भक्तिने कर्मशुद्धी होते व कर्म शुध्दि देहाशिवाय करता येत नाही. तो देहहि अवयव- इंद्रिये व अधिष्ठानयुक्त पाहिजे, तरच ज्ञानाधिकार व ज्ञान प्राप्त करता येते.

स्थूळ देही शब्दज्ञान झाल्यावर अपरोक्ष व सामान्य-ज्ञान होते आणि विशेष ज्ञान झाल्यानंतर अविद्येचा नाश होतो व जीव कैवल्य पदास जातो.

जीवाला अक्षररूप ज्ञान ज्ञानियाकडून मिळेल; परंतु शक्तिरूप ज्ञान ईश्वर-अवताराच्या पराघोळीत वाक्यशिवाय होत नाही. कारण अविद्यायुक्त जीवास स्वतः ज्ञान संभवत नाही व ज्ञानी जीवही अविद्यायुक्त असतोच. म्हणून ज्ञानशक्तिचे प्रेरकत्व ईश्वराशिवाय होत नाही. परन्तु जीव एकदेशी व अवयवयुक्तदेही स्थिरावल्यामुळे ज्या ज्या साधनाने ज्ञान देता येईल ते ते साधन करणे हे ईश्वराचें आद्य कर्तव्य आहे.

अविद्यायुक्त देहधारी जीवास पंचकोषाशिवाय व पंचज्ञानेंद्रिया-शिवाय कांहीच बोध होत नाही. कारण, जीवाचें कर्म भोगार्थं साधन

शरीर आहे. ते शरीर व जीव एकदेशी आहेत. सर्वव्यापी परमेश्वर पंच विषयातीत आहे तेव्हां पंचविषययुक्त साधनाद्वारे पंचविषयातीताचे ज्ञान कसे होईल ?

पराविद्येचा बोध जीवास शब्दाशिवाय कसा होणार ? शब्दवैखरीशिवाय कसा निघणार ? श्रोत्रेंद्रियाशिवाय ऐकूं कसे येणार ? शब्द हा वाचेचा विषय आहे. म्हणून उपदेशक व श्रोता उभयता मनुष्य देहधारी पाहिजेत.

उपदेशक व श्रोता दोन्ही जीव असले तरी कांही हरकत नाही. कारण उपदेशक ज्ञाता असला म्हणजे झालें परन्तु हे म्हणणें अवतारी परमेश्वराने प्रतिपादलेल्या तत्वज्ञानाची शुद्धता राहील त्यावेळपर्यंत योग्य आहे.

अल्पज्ञ जीवांनी स्वोक्तीचें मिश्रण करुन अन्यथा ज्ञानाचें बंड माजविलें की, ईश्वरीय सत्यज्ञान जीवापासून वंचित होते मग त्या ज्ञानाचा उपदेश कोण करणार ? मुक्त जीवात्मा किंवा मुक्तीतून परत आलेला आत्मा ! परंतु हें म्हणणें सुसंगत् नाहीं.

विशेष ज्ञानावांचून अविद्येचा नाश होत नाहीं व अविद्यानाशाशिवाय ईश्वराचा आनंद जीवास मिळत नाही. ईश्वराचा आनंद घेणारा जीव देहधारी असूं शकत नाहीं. तेव्हां मुक्त जीव उपदेशक होऊं शकत नाहीं. कारण, अविद्यायुक्त जीवाशिवाय पुनरावृत्ति होत नाहीं. अविद्यायुक्त जीवास सत्यज्ञान लाभत नाहीं. म्हणून ज्यावेळीं सत्यज्ञानाचें प्रस्थापन व असत्य ज्ञानाचा उच्छेद करणें असेल त्यावेळीं ईश्वर अवतार होतो. कारण ईश्वरीय शुद्धज्ञान ईश्वरावांचून दुसरा कोणीच उपदेशूं शकत नाहीं. तें ज्ञान उपदेशण्यास मनुष्यदेहाची आवश्यकता आहे. म्हणून ईश्वर सहाय्यक शक्तिाद्वारें मायापुराचा अंगीकार करुन अवतारकार्य सर्वव्यापी स्वरूपाधारें करतो.

परमेश्वर व त्याच्या अनंतशक्ति अमर्यादित आहेत. तथापि शक्तीचें कार्य सृष्टींत मर्यादित आहे. तेव्हां शक्तीला मर्यादा दिली;

यावरुन अमर्यादित शक्तीचें कार्य मर्यादित आहे. ही मर्यादा जीवाच्या कर्मफलानुसार प्रकृतिमय जड वस्तूला आहे असें गृहित धरुं. परन्तु त्या प्रकृतीचें ज्या शक्ति-द्वारें ईश्वराने धारण-पोषण केलें आहे. तीही मर्यादेचा अंगीकार करतें.

पृथ्वी, चंद्रसूर्य आदि ग्रहांचा आकार कोण्या जीवाच्या कर्मफलाचा नसून, या सर्वांना ईश्वराच्या शक्तीने मर्यादा दिली आहे. यावरुन शक्तीचे कार्य मर्यादीत आहे म्हणून अवतार होणें साहाजिक आहे.

ईश्वर सर्वांना सारखा प्रेरक असूं शकत नाहीं. कारण शब्द-स्थान व उच्चार सर्वांचा एक असतां सर्वांची भाषा एक कां राहूं नये ? या विचारावरुन जीवाच्या स्वातंत्र्याचा कांही सम्बन्ध आहे, असें कबूल करावें लागते.

'ईश्वर अवतार घेत नाहीं' म्हणणाऱ्यांनीं खंडनात्मक पुस्तकांचे त्येचे पाट करून शब्द-छल चालू करण्याची सवय लावून घतलेली असते. परन्तु शब्दाचा अर्थ कुठे व्यापक अर्थाने घ्यावा लागतो तर कोठे शब्दार्थ घ्यावा लागतो आणि तात्त्विक भाषाहि शिकावी लागते; तसेंच अर्थ कोठे प्रकरणानुरूपहि घ्यावा लागतो जसें, ईश्वरास 'सर्वकर्ता' म्हटलें आहे; येथे 'सर्व' शब्दांत जीव, देवता, प्रपंच या तिन्हींचा समवाय सम्बन्धी कर्ता ठरेल आणि या तिन्हींचें अनादित्व नष्ट होऊन व जीव देवतांच्या कर्मस्वातंत्र्यावर व क्रिया स्वातंत्र्यावर आघात येईल आणि द्वैतसिद्धांतांत व्याघात दोष निर्माण होईल म्हणून 'सृष्टीच्या कार्यक्रमाचा सर्वकर्ता' असा अर्थ घ्यावा लागेल. ही गोष्ट लक्षांत घेऊन अवताराची जाणीव करुन घेण्याकरितां अवतार विरोधी आणि अवतार प्रेमी यांनी चुकीच्या हट्टाला सोडावें.

महानुभाव तत्त्वज्ञान-दृष्टया जगांतील इतर तत्त्वज्ञानाकडे पाहिल्यास, जगांतील लोक अन्यथाज्ञानाला ईश्वरीय ज्ञान मानतात; कारण देवता मार्ग अनेक आहेत व ईश्वरीय मार्ग एकच असूं शकतो.

लोक देवतांनाचा ईश्वर म्हणत असून स्वतः ईश्वरवादी म्हणवून घेऊं लागले; म्हणूनच लौकिकाचार–पद्धतीने आम्ही स्थूल रूपाने मागे साम्य-स्थळें दाखविलीं आहेत, परंतु याचें सर्वसाधारण विवेचन पुढील प्रमाणें आहे.

वेद, चैतन्यमायेच्या विद्यावंतानी जागतिक सुखसाधनाला लागणाऱ्या विषयांचा पुरस्कार करून तयार केले. आत्मोपासित धर्माचा आचार करणारा चैतन्यमायेचें फल प्राप्त करतो हा यौगिक साधन-मार्ग सांगितला आहे. मायेला ईश्वर कल्पूनच हें ज्ञान सांगितलें आहे. माया स्वतः अवतार घेत नाहीं व ती नित्यमुक्तीहि देत नाहीं.

जगमय नटलेलें चैतन्य ब्रह्म हें अभेदरूपाने सांगितलें आहे व अखिल जगत ब्रह्ममय आहे, अशी कल्पना गृहित धरून पूर्ण अद्वैत मार्ग तयार केला आहे यालाहि चैतन्यफल मिळतें. हा संलग्नधर्म आहे.

या कृतयुगाच्या सिद्धांताला धरूनच युगायुगीं उपासना मार्ग निघाले आहेत. आर्य द्वैती व सनातन अद्वैती दोघे ही या वेदाधारेंच तत्त्व मानतात.

आगम शास्त्रकारांनी विश्व, भैरव व शेषशायी या देवतांना ईश्वर कल्पिलें आहे. या शास्त्रानुकूल वागणाऱ्यास त्याच देवतांची फलप्राप्ति होते या भक्ति मार्गात नाथपंथी व वीरशैव यांची गणाना होते.

ब्रह्मा, विष्णु व महादेव यांनी ईश्वर कल्पनाऱ्यापैकी माता-पिता, यांच्या भक्तिद्वारें विष्णुचे फळ मिळतें. गुरुभक्तिने शिवाचे पद आणि बंधु व पतिभक्तिने ब्रह्मदेवाचें पद प्राप्त होते. हा भक्तिमार्ग त्रेतायुगांत चालत होता. तीच प्रथा माता-पिता विशेष वारकरी, व गुरुविशेष लिंगायत, गुरुमार्गी यांनी भक्ति स्वीकारली आहे.

इंद्र, चंद्र व सूर्य यांना ईश्वर कल्पून यज्ञयागाच्या द्वारें उपासना सुरू केली व वर्णाश्रमाचें महात्व वर्णून सर्वसुखच मिळविण्याचें कार्य ब्राह्मणानी चालू केलें ही उपासना द्वापारयुगांत प्रामुख्याने चालत होती. पृथ्वी, पाणी व आकाश यांत संचार कारणारे गंधर्व, अष्टोदेवयोनी व

कर्म-भूमि या देवतांस जड पार्थिव पदार्थाधारे ईश्वर कल्पून उपासना करूं लागले. त्यांना त्यांचेच फळ मिळते. ही भक्ती कलियुगांत फार झाली. याला प्रमाण ग्रंथ पुराणें आहेत.

या सर्व देवता-धर्माचा त्याग करून सत्य ज्ञानाचा अभ्यास मन: पूर्वक केल्यास ईश्वराचें सर्वांगीण स्वरूप ध्यानांत येईल. परंतु देवता-धर्म असत्य नाहीत मात्र त्याने ईश्वर प्राप्ती होत नाही.

परमेश्वरीय तत्वज्ञानांत देवताधर्माचें मिश्रण कांही कालावधीने होत असते त्यामुळें अन्यथा ज्ञानाचा समावेश होतो मग सत्य ज्ञानाचा निष्कर्ष निघणें कठिण जाते. अशा वेळी ईश्वर निर्मित ब्रह्मविद्याशास्त्राधारे शोधन करावे आणि ईश्वर अवताराचे रहस्य समजून घ्यावे.

एकूण सर्वव्यापी निराकार ईश्वर-स्वरूप आपल्या शक्तिद्वारें अवतारकार्य चालवितें. कारण, एकदेशी वस्तु सर्वदेशी असू किंवा होऊं शकत नाहीं; परंतु सर्वदेशी वस्तु एक देशांत असते, हे निर्विवाद आहे. जीव हा एकदेशी आहे. त्याच्या स्वरुपमर्यादेने ज्या ईश्वराच्या देशांत जीव आहे, त्या देशांतच ईश्वरस्वरुप अंतर्मर्यादेनेच असणार आणि त्या मर्यादेशील स्वरूपाधारेच ज्ञान किंवा मोक्षानंद मिळणार !

जीवात्मा चारी वस्तूच्या ज्ञान विकासाने सर्वज्ञ होऊं शकतो; पण स्वरूपाने विकसित सर्वदेशीय सर्वज्ञ होऊ शकत नाही म्हणून सर्वत्र क्रिया होत नाहींत. ईश्वरहि बिंदु किंवा शुन्याच्या द्वारेंच प्रगट होतो हें योगशास्त्राधारें कळून येईल.

एखादा ज्ञाता मनुष्य आपल्या मुलाला विद्या शिकवितांना बालभाषेंत बोबडे शब्द उच्चारूं लागला, म्हणजे तो ज्ञाता विद्याहीन किंवा बालक झाला असे कसे म्हणतां येईल ?

जेलर कैद्याच्या सुव्यवस्थेकरितां जेलमध्ये गेला तर तो बंधनाच्या दु:खास पात्र झाला असें म्हणता येईल काय ? याप्रमाणे, ईश्वर सहीत

शक्तिद्वारें कार्यरूप अवतार धारणकरून ज्ञानशक्तिद्वारें मानव जातीच्या उद्धाराकरितां सर्वत्र संचार करतो.

या साऱ्या विचारांवरून हें सिद्ध झालें की, परमेश्वर निराकार व सर्वदेशी असूनहि, मायापुराधरें अवतारकार्य जीवांच्या कल्याणाकरितां करतो.

या विषयावर याहिपेक्षा सविस्तर व सूक्ष्म विवेचन होणें अत्याव-श्यक आहे. परन्तु निराकारासह साकार उपासनेच्या या लेखांत संबंध असल्यामुळे येथे स्थूलमानाने थोडक्यांत विचार प्रगट केला आहे.

## परमेश्वर-नामविचार

परमेश्वर गुणधर्माने अनंतशक्तियुक्त असल्यामुळें त्यानें सृष्टि रचनेला अनेक शक्तीचा उपयोग केलेला आहे. जीवांनी आपापल्या अधिकारानुसार त्यांना ज्या ज्या शक्तींचा परिचय व अनुभव मिळाला त्या त्या शक्तीस आपापली इष्ट देवता ठरवून तोच परमेश्वर आहे असें गृहित केलें. सामुदायिक शक्तींची नावें ईश्वराला ठेवण्यांत आली.

कारण, देवता भक्तांच्या कल्पनेने ईश्वर व शक्ति एकच आहेत. याच निश्चयाने परमेश्वरास सर्वशक्तिमान म्हटलें आहे, परंतु परमेश्व-राच्या स्वरूपाचा व शक्तीचा कार्यकारणसंबंध कसा आहे, याचा ज्ञानपूर्वक सत्य विचार केलेला ज्ञाता किंवा ग्रंथ आढळणें दुर्मिळ झाले आहे.

ज्या त्या ग्रंथांत पहावे किंवा कांहीं महात्म्यांजवळ जावे तरी त्यांचे जवळहि शक्तिरूप देवता ज्ञानाचें व मिश्र भक्तीचें बंड माजलेंले आहे. म्हणून सर्व शक्तियुक्त निराकार व साकार परमेश्वराचे नांव कोणते आहें, याचा निर्णय लागत नाहीं.

कारण, पुराणकारांनी शिव, विष्णु, ब्रह्मदेव, गंधर्व, विश्वविराट चैतन्य व स्वर्गस्थ इंद्र—चंद्रादि आणि राम, परशुराम, विठ्ठल नृसिंहादि नावें वर्णिलीं आहेत व शास्त्रवेत्त्यांनी सच्चिदानंद, ओम्, पुरुषोत्तम, अनंत,

देव, आनंद, परमात्मा, परमेश्वर, ईश्वर, देवता, अहं, सोऽहं, तत्त्वमसि इत्यादि नावें संबोधिलीं आहेत.

तसेंच विष्णुसहस्रनाम व शिवमहिम्नादि स्तोत्रांत पुष्कळ नावें वर्णिलेलीं आहेत. त्यापैकी कित्येक संयोगिक नावें आहेत तर कित्येक निःपातिक नांवें आहेत व कित्येक युक्त आहेत.

"अहंसोऽहं", 'तत्त्वमसि' या नाम जपाने ध्यान करावे असें अद्वैतवादी म्हणतात परंतु हें म्हणणें विसंगत आहे. कारण 'तत्त्वमसि' म्हणजे तत्-ते (ब्रह्म) त्वं-तू असि-आहेस, तें तूं आहेस ! अहं म्हणजे मी, सोऽहं म्हणजे तें मी. या दर्शक सर्वनामाने ब्रह्मवस्तूचा बोध होत नाहीं.

अहंसोऽहं या नांवाने श्वासोच्छ्वासांत जप होतो परंतु श्वासोच्छ्वास हा प्राणवायूचा गतिप्रवाह आहे. त्यासच जपनाम कल्पिने सुसंगत नाहीं. कारण, प्राणवायूचा प्रवाह ज्ञाता-अज्ञान, पशु-पक्षी, जीव जंतूंचा सारखा चालू आहेच, मग ज्ञानाचें महत्त्व काय ? आणि ज्ञान कशाचें ? फक्त 'मी ब्रह्म आहे' असें म्हणण्याचें ! ब्रह्मवस्तु स्वरूपापासून मायेच्या संयोगाने विस्मृत होऊन कर्म व कर्मफलांच्या सुखदुःखास प्राप्त होते, हें म्हणणें किती हास्यास्पद आहे ! म्हणून 'अहंसोऽहं' किंवा 'तत्त्वमसि' हें महावाक्य नाहीं. तर उपनिषदातील मंत्रपद आहेत.

द्वैततत्त्वज्ञानाने या सिद्धांताचा परामर्ष घेतला आहे की 'मी ब्रह्म आहे' असें म्हणणें अज्ञानपणाचें आहे. जी वस्तु ब्रह्म नाहीं ती वस्तु ब्रह्म कल्पिणें हें अन्यथाज्ञान आहे.

'तत्' हें दर्शक सर्वनाम ब्रह्मवाचक आहे असें गीताशास्त्राधारे गृहित केलें तरी तें द्वितीय पुरुषवाचक आहे. परंतु जीव वस्तूच्या ऐक्यवाचक घडत नाहीं.

येथे सर्व नांवांचा मुख्यतः विचार नमूद करून, या सर्व नावाचा अंतर्भाव ज्या एका नामांत होतो, तें नाम सिद्ध करण्याचा प्रयत्न केला जात आहे.

शिव - शुभदायक, शंकर-कल्याणप्रद, महादेव- औदार्यवान, विष्णु-व्यापक ब्रह्मदेव-बृहद्‌अभिव्यापको, विराट, विश्व तथा हिरण्यगर्भ-विशाल

रूप जगदाधारशक्ति, चैतन्य-चेतन, इन्द्र-मालक अथवा राजा, चंद्र-द्रावक, सूर्य-प्रकाशक, गंधर्व-सौंदर्यवान्, अष्टोदेवयोनी - अष्टदिक्पाल; कर्मभूमि-कर्माचें आश्रयस्थान; इत्यादि सर्व नावें कार्यरूप गुणवाचक आहेत.

रमतेति राम, विठ्ठल-विटेवरील, गणेश-गणांचा ईश; हरि-हरण करणारा इत्यादि मूर्तिरूप गुणवाचक व संयोगिक नावें आहेत.

या संयोगिक गुण-नामांचा संबंध ज्या ज्या देवताशक्तीशी येतो, तीं तीं नावें ठेवून देवतेसच ईश्वरतत्व कल्पिलें; परंतु हीं नावें पूर्ण नाहीत.

आता सच्चिदानंद असें नांव सत्, चित्, आनंद या तीन शब्दांच्या संयोगाने बनलें आहे याचा शब्दार्थ सत्-खरे, चित्-चेतन, आनंद-सुखमय असा आहे. शास्त्रांत योगिक अर्थ-'सत्शब्दे ब्रह्म बोलिजे, चित्शब्दे माया बोलिजे, आनंद शब्दे ईश्वर' असा त्र्यंशयुक्त परमेश्वर आहे. म्हणजे व्यापकार्थी ब्रह्म आहे; आनंदार्थी ईश्वर आहे; कार्यार्थी माया आहे. या अंशत्रयाने कारणरूप सच्चिदानंद नांव संयोगिक आहे.

ओम् प्रणव हें वैदिक कर्मप्रधान कार्यरूप नांव आहे. अ, उ, म्, या तीन मातृकांचा संबंध अस्ति, भाति, प्रिय व स्थिति, उत्पत्ति, प्रलय व कार्याशी आहे; म्हणून हे कार्यरूप संयोगिक नांव आहे.

पुरुषोत्तम—उत्तमपुरुष या नांवाचा पर्यायी शब्द चांगदेव आहे. चांग - उत्तम दोषरहित देव दिव्य गुणाने प्रकाशवंत. अनंत मर्यादित, अगाध स्वरूप परमात्मा. ईश्वर-ऐश्वर्यवान्, आनंद-स्वरुपी निरतिशय-सुख परमात्मा-आत्मा म्हणजे जीव देवता, प्रपंच याहून पर अर्थात् श्रेष्ठ तो परमात्मा. परमेश्वर परम ऐश्वर्यवान्, देवता-दिव्यगुणांचें विशेषत्व दातव्य करणारा उदार इत्यादि.

परमेश्वराच्या जडा व चेतना शक्ति तथा गुणरूप शक्तींचा पूर्ण बोध होणें आवश्यक आहे. कारण, या सर्व शक्तींचा उपयोग सृष्टिरचने-कडे ईश्वराने कसकसा केला आहे. हा संबंध न मिळाल्यामुळे, हीं सर्व

नावें एका ईश्वरासच दिली आहेत परंतु ते सत्य नाहीं. कारण या नांवांत किंत्येक नांवें गुणरूप तर कित्येक धर्मरूप व कित्येक देवतात्मक शक्तिरूप आहेत. हीं नांवें गुणधर्म संयोगाने झाली आहेत. मूलतःच स्वरूपनिष्ठ निःपातिक नांवें नसल्यामुळे या नावांनीं ईश्वरीय साधन-साध्य प्राप्त होऊं शकत नाहीं. मात्र सहेतुक क्रियेची फळें मिळूं शकतात.

म्हणून सर्व गुणधर्म शक्तियुक्त संयोगासह निःपातिक जे नांव असेल तेंच नांव निर्हेतुक साध्य-साधन सुखात प्राप्त करणारें असतें. या करिता मागील सर्व नावांचा परामर्ष घेऊन सिद्धांतिक एकच नाम सिद्ध करण्याचा विचार निर्दिष्ट केला जात आहे.

माया ही मुख्यचेतन शक्ती आहे तिच्या धर्मवंतपणाच्या संयोगाने ईश्वराचे ऐश्वर्यादि धर्मांचे कार्य चालतात. माया स्वरूपांत अविद्या-युक्त अनंत जीव व अनंत ब्रह्मांडाच्या चेतना ज्या देवता शक्ती आणि प्रत्येक भैरव देवतेच्या स्वरूपीचा प्रपंच हे तिन्ही पदार्थ आहेत.

प्रपंच हा मायासह देवतेच्या किंवा ईश्वराच्या उपयोगी नाहीं. अविद्यायुक्त जीवाच्या सुख दुःख भोगास किंवा ईश्वर प्राप्तिच्या साधनास उपयोगी आहे. म्हणून जीव प्रपंचावेगळा सच्चिदानंद परमेश्वर आहे.

माया स्वरूपाच्या बाहेरील अनंत रूप जो ईश्वर तो क्रिया संबंधीत नसल्यामुळें ब्रह्म आहे अर्थात् ब्रह्म ही स्वतंत्र वस्तु नाही. तेच सर्व धर्म रहित आहे. या ब्रह्मासीच मायेचा जिथे संबंध आला तेथे शक्तीचे युक्तत्व आहे व तिथेच अतीत धर्माने शक्तीरहित ही आहे. म्हणूनच त्र्यंश परमेश्वर म्हटले आहे.

महावाक्य प्रकरणाच्या पहिल्या सूत्रांत जीव व प्रपंच या दोन्ही वस्तूचे वेगळेंपण दाखवून सर्व शक्तिचें युक्तत्व दाखविलें आहे; आणि सच्चिदानंद पदाची व्याख्या "सत्-ब्रह्म चित्-माया आनंद-ईश्वर असा त्र्यंश परमेश्वर आहे पण एक आहे" अशी केली आहे. तात्पर्य तीन वस्तु

एका अंशियापासून तयार झाल्या नसून परमेश्वर वस्तु एकच आहे परंतु गुणधर्मकार्यांनी त्रिविधा उच्चार केली आहे.

जर ब्रह्मवस्तु परमेश्वराहून दुसरी आहे असें गृहित धरले तर तात्विक विचारांत फारच गोंधळ होत आहे. तथापि कांहीं ज्ञात्यांनी या मताचा अंगीकार केला आहे, तो साध्य प्राप्तीच्या वचनामुळें, हा भेद साधनापुरता मान्य राहील परंतु दोन्ही फळें नित्य ठरविल्यास ईश्वराच्या समत्वाला बाधा येईल ! असे शोधांति वाटते.

ज्ञानविज्ञानादि गुण व स्वरुपनिष्ठ धर्म या जडा शक्ति ईश्वर-स्वरूपाधीन व युक्त आहेत. माया देवतेच्या आधीन नाहींत. तथापि कांहीं जडाशक्तीचें कार्य जीव, देवता प्रपंच या तीन वस्तूंच्या उपयोगाचें आहे, आणि या जडाशक्तींचें कार्य मायास्वरुपी चालतें. म्हणून माया युक्त ईश्वरस्वरुपाला सर्व शक्ती युक्त म्हटले आहे.

परंतु मायारहित शक्तियुक्त ईश्वर व शक्तिरहित ईश्वर, असे ईश्व-राचे दोन भेद आहेत. पैकीं ब्रम्ह हें शक्तिरहित ईश्वर आहे आणि ईश्वर हा शक्तियुक्त व मायायुक्त ईश्वर आहे या वरुन ब्रम्ह, माया, ईश्वर असे तीन भेद दिसतात, म्हणून त्र्यंश म्हटले आहे. परंतु माया व ईश्वर या दोन वस्तुच्या संयोगांत तिसरी वस्तू आहे. या अव्यक्त परमेश्वराचे नांव सच्चिदानंद हे त्र्यंशामुळें आहे.

परंतु महावाक्याच्या पहिल्या सूत्रांत जीव व प्रपंच यावेगळा सर्व शक्तियुक्त परमेश्वर आहे असें स्पष्ट म्हटलें आहे. याचें खरें कारण प्रपंच हा पदार्थ भैरव देवतेच्या स्वरुपी आहे पण तो प्रपंच भैरवस्वरुपास ठाऊक नाही. प्रपंच हा जड असल्यामुळे स्वयं निष्क्रिय आहे, म्हणून त्यांत बद्ध मुक्त लक्षण नाही. पण स्वतंत्र पदार्थ आहे, त्यामुळे प्रपंच वेगळा आहे.

तसाच जीव हा पदार्थ अनादि-अविद्यायुक्त मायास्वरूपी तमांत आहे. परंतु मायाशक्तीस जीवाचें खरें स्वरूप काय आहे हें माहीत

नाही. ती अविद्येसच जीव म्हणते; म्हणून अविद्यायुक्त जीव मोक्षप्राप्ति-पर्यंत वेगळाच आहे.

जीव हा ईश्वरानंदांत निमग्न झाल्यावर आनंदार्थाने ऐक्यरूप आहे परंतु स्वरूपाने वेगळाच आहे.

जीवाचें व प्रपंचाचें खरें स्वरूपास्तित्व ईश्वरासच ठाऊक, देवतेस कळत नाहीं. म्हणून या, दोन्ही वस्तु देवतास्वरुपांत रहात असून, देवतेस पदार्थास्तित्व नाही. एकूण जीव व प्रपंच. परमेश्वराहून वेगळे आहेत.

सदरहू विवेचन परमेश्वराच्या जडाशक्ती या स्वरुपगत व माया अधीन चेतन शक्तिबद्दल केलें आहे. कारण अनंतशक्तियुक्त परमेश्वराचें नांव निश्चित करण्याचा हेतु आहे.

परमेश्वराचा सृष्टिविषयक एकंदर व्यापार शक्तिद्वारें चालतो; म्हणून सृष्टिच्या कार्यापासून ईश्वराच्या कारण स्वरूपापर्यंत ज्या नांवाचा बोध होतो त्या नामाचा विचार केला जात आहे कारण, कांहीं जडा तथा चेतना शक्ति रहित जो ब्रह्मरुप ईश्वर तो सृष्टीच्या कार्य कारण संबंधाला असमर्थ आहे. तसेंच ॐ हे नांव कार्यरुप आहे तर सच्चिदानंद हें नांव कारणरूप आहे म्हणून परमेश्वराचें सर्व शक्तियुक्त स्वरूपलक्षण कार्यकारणासह असलेलें नामाचा शोध केला जात आहे योग्य त्या नामाचें स्मरण केल्याने साधन व साध्य सफल होते.

परमेश्वर सृष्टीचा व्यापार मायासह चेतनाशक्ति व कृपादि गुणधर्म जडा शक्ति या उभय शक्तिद्वारें करतो. परंतु जडाशक्ति कारण आहेत व चेतनाशक्ति कार्य सहायक आहे या चेतना शक्तिस देवता म्हणतात ती स्वरूपें चक्राकार आहेत. कर्म व कर्मफलहि रहाटघडी प्रमाणेंच मिळतात "एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीहयः" या गीता-वचनांत प्रवृत्तिस चक्राची उपमा दिली आहे. तसेंच "भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारुढानि मायया" (गीता अ. १८-६१) या वचनाप्रमाणें 'मायाचक्र' भ्रमण करीत आहे. त्यामुळे जीवास देहीक सर्व सुखें व दुःखे पर्यायाने मिळतात.

या कर्म चक्राची गती फार कठींण आहे. असे "कर्मणो गहना गतिः" या वाक्यात प्रतिपादिलें आहे.

यजुर्वेद (अ. १-३३-८) व महाभारत [वनपर्व अ. १३३] या दोन ग्रंथांत परमेश्वर चक्राधार आहे, असें वर्णिलें आहे. या विवेचनावरुन असें तत्व निघतें की-देवताचक्र, प्रवृत्तिरूप सृष्टीचक्र, जीवाचें कर्मचक्र, ईश्वराचे ज्ञान-विज्ञानचक्र धर्मचक्र, जीवास मिळणारें आनंदचक्र इत्यादि अनंत शक्तिचक्रांचा समावेश "श्रीचक्र" या शब्दांत होतो.

'श्री' म्हणजे गुणधर्ममय कृपाशक्ति व कार्यरूप मायाशक्ति. या जडा व चेतना शक्तीत मुख्य आहेत.

जडाशक्तियुक्त ईश्वरसंबंधित असलेली माया, तिच्या संयोगे ऐश्वर्यादि धर्मचक्र व कर्तृत्वादि सृष्टीचें प्रवृत्तिचक्र, त्यांत देवताचक्र, जीवाचें कर्मचक्र, मायापुराच्या संबधे ज्ञानचक्र, या चक्रसमूहाला कारण मायाशक्ति आहे. या मायेला प्रवृत्तिक प्रेरणा करणारी कृपा आहे.

सदरहू कारणरूप कार्यरूप चक्र म्हणजे "श्रीचक्र"! या जीव, देवता व प्रपंचयुक्त मायाचक्राला व सर्व गुणधर्मयुक्त शक्तिचक्राला धारण किंवा पोषण करणारा परमेश्वर 'धर' शब्दाने संबोधिला आहे.

"धृ" धातुपासून धर्म व धैर्य शब्दाची उत्पत्ति झाली आहे. 'यत् धार्यते तत् धर्मः!' धारण करण्यायोग्य किंवा धरलेलें, हा "धर्म" शब्दाचा अर्थ आहे. धर्म दोन प्रकारचे असतात. एक गुणरूप धर्म, दुसरे नित्य स्वरूपधर्म! यापैकीं परमेश्वरांच्या नित्यधर्माच्या संयोगाने व व्याप्य-व्यापकत्वाने अनादि कालापासून 'श्रीचक्रा' ला धारण केलेलें आहे. म्हणून गत, भविष्य व वर्तमान या त्रिकाल-मर्यादातीत "धर" हा शब्द योजिला आहे, हे श्री गोविंदप्रभूने हरिपालास श्रीचक्रधर नांव संबोधिले. यावरून स्पष्ट होते.

भगवान् श्री चक्रधर स्वामीने परसिद्धांत निरूपणप्रसंगीं आचार्य नागदेव यांना 'श्रीचक्रधर' हें नाम उपदेशिलें आहे. तेव्हां हें नांव

साकार परमेश्वरास कार्य-कारण शक्तियुक्त सर्व ईश्वर अवतारांस लागू आहे, असें ओघाने सिद्ध होत आहे.

आतां, मूर्तिधारी साकाररूप श्रीकृष्णाचे हातांत सुदर्शनचक्र आहे म्हणून 'चक्रधर' म्हटलें आहे; असे जर गृहित केलें तर ते अवांतर संयोगिक नाम आहे. व ते श्रीकृष्णासहि स्वरूपदृष्ट्या नाम योग्यच आहे. परंतु अशा संयोगिक नामांत स्वरूपांग निःपातिक जो नित्यसंबंध तो येऊं शकत नाहीं. म्हणून चिन्हयुक्त तथा मायापूरयुक्त नाम विद्यमान कार्यापुरतेच असते, अशा चिन्हमय भावनेने केलेलें नामस्मरण प्रेममय होईल, पण ज्ञानमय होऊं शकत नाहीं म्हणून स्वरूपांतर्गत लक्षणांसह "श्री चक्रधर" हें नाम निःपातिक आहे.

सृष्टिरचनेमध्यें प्रत्येक ब्रह्मांड पन्नास कोटी योजनें आहे; परंतु हिरण्यगर्भ विश्वमूर्तीच्या पोटांत ५ लक्ष योजनांत क्षीराब्धीच्या शेषशायी नारायणाचें स्थान स्त्री व पुरुषयुक्त आहे आणि उभयांत पतीपत्नीचे नाते असल्याप्रमाणें तें वागतात.

चैतन्य स्थानविशेषीं नाही. विश्वमूर्तिमय व एक ब्रह्मांड विकास आहे. भैरव देवतेंत स्त्रीत्वसंबंध व स्थाननियमन नाहीं.

स्त्री—पुरुषांचा शेवट क्षीराब्धीपर्यंत आहे. तसेंच शरीरसौंदर्यहि तेथपर्यंतच आहे. म्हणून मनुष्यवेषीं उभयदृश्य ईश्वर अवतार गर्भास स्वीकारते वेळीं शेषशायी नारायणाच्या मूर्तिप्रमाणें सौंदर्ययुक्त देहाचा अंगीकार करतो त्यामुळें शंखचक्रादि आयुधें श्रीकृष्ण व श्रीदत्तात्रेय प्रभूच्या हातांत असल्याचें वर्णिलेले आहे.

परंतु आयुधाविषयीं नियम सर्वच अवतारांस लागू आहे असे नाहीं. कारण क्षीराब्धपद पावन होणाऱ्या जीवार्जकाचे देह ज्या अवतारांनी स्वीकारले असतील त्या अवताराशी आयुधांचा संबंध येतो. म्हणून श्रीकृष्णास श्रीचक्रधर हें संयोगिक नांव आले आहे.

हंस, कृष्ण, दत्त, चक्रपाणी ( चांगदेव ) गुन्डमराऊळ ( गोविंद

प्रभु ) हरिपाल ही मातापित्याने देहिक नात्याने नांवें ठेविलेली आहेत आणि त्या नांवाचा स्वीकार व्यक्ताव्यक्त स्वरूपनियमाने करतात.

काल-प्रवाहाने अवतार समाप्ति नंतर ते नांव योग्यताजनक ठरते, परंतु साध्य व साधन पूर्ण होऊं शकत नाहीं. म्हणून सर्व अवतार निराकारस्वरूपी असलेलें निःपातिक पण संयोगसाध्य असें 'श्रीचक्रधर' हें नांवच स्वीकारतात. कारण नित्य स्विकाराचें नांव आहे मायापुराचें नांव समयानुसार स्वीकारीत असतात.

कांहीं अवतार आपल्या प्रवृत्ति अनुसारे नाम स्विकारतात. कोणी कार्यरुप तर कोणी कारणरुप, कोणी उभयरुप तर कोणी स्वरुप लक्षण युक्त स्विकारतात.

परंतु 'श्रीचक्रधर', हें नांव कार्य कारण. व स्वरूपलक्षणयुक्त आहे. म्हणून 'श्रीचक्रधर', हे नाम सर्वकाळी स्मरणीय आहे.

———*———

## पाणी शोधून का प्यावे ?

महानुभाव पाणी शोधून पीतात हे सर्वांना माहीत आहे कारण, श्रीचक्रधरस्वामींनी आपल्या साधकांस वस्त्रपरिधान विधीच्या प्रसंगी आज्ञा दिली आहे की, 'हात चार सूडा मागावा.' श्रीमुखोक्त या वचनाच्या भाष्यांत भाष्यकारांनी 'शोधणे करावे,' (आचार प्रकरण सूत्र ११६) असे स्पष्ट म्हटले आहे. नागदेव स्मृति मध्येहि पाणी शोधून पिण्याचा उल्लेख मिळतो. स्वतः श्री नागदेवाचार्य पाणि शोधून पीत असत.

दृष्टिपूतंन्यसत्पादम् वस्त्रपूतं जलं पिबेत् ।

(मनुस्मृति अ. ३ श्लो. ६)

श्री भागवत ग्रंथाच्या अकराव्या स्कंधांत देखील मनुस्मृतीचा हाच श्लोक आढळतो यावरून पाणी शोधून प्यावे हाच संन्यास धर्म आहे. असे सिद्ध होते.

पाणी शोधून पीण्यांत केवळ अहिंसा पालन करण्याचाच दृष्टी-कोण नसून शारीरिक आरोग्यतेचाहि दृष्टिकोण आहे. याला स्वास्थ्य संरक्षणाचा स्थूल नियम म्हणता येईल

साधक जेव्हां परिभ्रमण करतो तेव्हां भिन्न भिन्न स्थळीं जाण्याचा व विजन करण्याचा त्याला योग येतो, त्यावेळीं लहान लहान डबकीं व अस्वच्छ तलाव इत्यादि अनेक ठिकाणचे पाणी पिण्याचे प्रसंग येतात, ऋतुकालानुसार पाणी बिघडलेलेंहि असते. पाण्यांत अनेक जंतू निर्माण होतात. त्यांत काही जंतू रोगवृद्धीकारक पण असतात त्यामुळे पाणी गाळून घेतले असता सडलेले पदार्थ आणि स्थूल जंतूपासून रक्षण होऊन शरीर-स्वास्थ्य बिघडत नाहीं.

गाळून घेतलेल्या पाण्यातील जंतू शक्य तो मरू न देण्याची खबरदारी घेतली तरच अहिंसा धर्माचे पालन होईल. त्याकरिता पाणी शोधण्याचे एक तंत्र आहे त्याप्रमाणे पाणी शोधल्यास आरोग्य रक्षण व अहिंसा पालन होऊ शकते.

पाणी शोधण्याचा कपडा जाड व घट्ट असावा त्या कपड्यांत एक ओंजळ भर पाणी थोडा वेळ तरी राहू शकते कारण पाण्यातील जंतू पाण्याशिवाय राहू शकत नाहींत. काही जंतू मरणासन्न होतात. याकरिता शोधण्यांत थोडे तरी पाणी राहिलेच पाहिजे.

गळून जाणारे पाणी व त्याबरोबर जाणारे जंतू तर मरत नाहींत. जे अडकणारे पाणी त्याच्या आश्रयाने राहिलेले जंतू राहतात कारण कितीहि कपडा जाड असला तरी ज्यातून पाणी जाते त्यातून जंतू जाणारच.

स्थूल जंतू, केर कचरा व मळ हे साचून राहतात. त्यामुळे नारू आदि रोग होत नाहींत. हा लाभ आहे. पाणी शोधण्याचा कपडा जरा लांब व चतुष्कोणी असावा. भिन्न पाण्यातील भिन्न भिन्न जंतू असतात ज्या त्या आडांत, विहिरीत आणि नदींत ते ते पाणी शिल्लक असलेले एका पात्रांत घेऊन ते पाणी त्या त्या ठिकाणी सोडावे. कारण पाण्याच्या व जमीनीच्या भिन्नतेमुळें एका विहिरीतील प्राणी दुसऱ्या विहिरीत टाकले

तर ते वाचतीलच असा निश्चित नियम नाहीं. एकाधे पाणी विरुद्ध असते त्यामुळे दुसऱ्या स्थळातील जंतू मरण पावतात म्हणून ज्या त्या ठिकाणचे जळ-जंतू त्या त्या स्थळींच सोडावे. हा नियम आचारशील महानुभाव सांभाळतात.

म्हणून महानुभावपंथीय अहिंसापालन व स्वास्थ्य संरक्षणाकरिता पाणी शोधून पीतात हे स्पष्ट लक्षांत येईल.

## दंडवत प्रणाम.

सर्वज्ञ श्रीचक्रधरस्वामींनी आपल्या अच्युत-गोत्रीय परिवारास परस्पर भेट होताच दंडवत प्रणाम करण्याची आज्ञा दिली आहे.

अष्टविध भक्त, ज्ञानीजन, वेधवंत, बोधवंत तथा दर्शनीय पर्यंत दंडवत प्रणाम करण्याचा आदेश दिला आहे.

तसेच परमेश्वरीय अवताराच्या अंग संगाने ज्या ज्या वस्तूस किंवा पदार्थास पवित्रता येते त्या सर्व प्रकारच्या संबंधित वस्तूस अथवा पदार्थास नमस्कार किंवा वंदन करण्याची आज्ञा दिली आहे.

प्रायः वन्दन, नमस्कार आणि दंडवत प्रणाम हे शब्द महानुभाव साहित्यांत आलेले आहेत तथापि वन्दन व नमस्कार शब्द केवळ विशेष प्रसाद आदि जड वस्तू करितां उपयोगांत आणलेला आहे. आणि दंडवत प्रणाम शब्दाचा प्रयोग भिक्षुक वासनिकाकरिता अर्थात चेतन परिवाराकरितां केला जात आहे.

ज्ञानेश्वरी अ. ११।४४।५६७ मध्येहि दंडवत प्रणाम शब्दाचा प्रयोग केलेला आहे. तसेच महानुभाव साहित्यांतहि हे तिन्ही शब्द मिळतात वंद्य - वंदन, नमस्कार हा शब्द वचनांत मिळतात आणि दं. प्र. लिळा चरित्रांत मिळतात म्हणून वन्दन, नमस्कार, दंडवत प्रणाम करणे आम्हा महानुभावीयांचे मुख्य अंग आहे.

### दंडवत प्रणाम शब्दाचा अभिधेय अर्थ

दंड-काठी, वत्-त्याप्रमाणे प्रणाम करणे. काठी हातात धरली असतां उभी असते व सोडून दिल्यावर जमीनीवर सरळ आडवी पडते.

तशा प्रकारें प्रथम दोन्ही हात जोडून उभे रहावे आणि नंतर जमीनीवर सरळ पालथे पडावे. म्हणजे दोन हात, दोन पाय, दोन गुडघे, छाती आणि मस्तक हे आठ अंग जमिनीवर टेकावे. यास दंडवत-प्रणाम किंवा साष्टांग नमस्कार म्हणतात (ज्ञानेश्वरी अ. १७ लोक १४ ओ. २०४ पहा.)

केव्हा साष्टांग तर केव्हां अनन्य विनम्र भावनेने दंडवत प्र० करतात मात्र•कायाप्रणाम अथवा शब्दमात्र प्रणाम महानुभावांना मान्य नाहीं कारण त्यांत अहंभाव दिसून येतो.

काहीं कालाने प्रणाम शब्द कमी होऊन दंडवत शब्दच रूढ राहिला तरीपण दंडवत म्हणताच प्रणाम शब्दाचा अध्याहार होतो. सध्या सर्व महानुभाव दंडवत शब्दाचाच उपयोग करतात.

## साष्टांग दंडवत प्रणाम कसा घालावा

प्रथम दोन्ही हात जोडून उभे टाकावे पुन: लवावे व दोन्ही हात जमीनीवर टेकावे म्हणजे ओणवें व्हावे. उजवा गुडघा जमीनीवर टेकावा नंतर डावा गुडघा टेकवावा. पुन: छाती हाताकडे नेऊन टेकवावी व मस्तक टेकवावें झाला साष्टांग दंडवत प्रणाम.क्रमश: पूर्ववत छाती मस्तक उचलून गुडघे एक एक उचलावे व दोन्ही हात जोडून उभे टाकावे म्हणजे नमस्कार करावा.

## साष्टांग दंडवत घातल्यापासून लाभ

दंडवत घातल्याने शारिरीक श्रम होतो. खरे पाहूं जाता हें आहे कीं हा आध्यात्मिक, धार्मिक व्यायाम आहे इंद्रिय दमन करण्यास सहायता मिळते. स्मरण शक्तिची वाढ होते. दक्षता येते वैद्यकीय दृष्टीनेहि आरोग्य प्राप्त होते. शरिरांत स्फूर्ति निर्माण होते. नम्रता वृद्धिंगत होते. भक्ति वाढत चालते. दं. प्र. शब्द विनयतेचो प्रतिमा आहे. हे दंडवत शब्दाचे रहस्य आहे.

एकंदर मी जे अल्पस्वल्प विवेचन केले आहे. त्यांत चुका राहण्याचा संभव आहे तरी आपण हंसक्षीर न्यायाने रसग्रहण करावा, ही विनंती.

— स मा प्त —

## नामस्मरणाच्या वेळेचे कोष्टक (पृष्ठ १९ वरुन)

नामाची अक्षरें १८ आहेत. २० नामाचा क्षण होतो. २०० नामाची १ घटिका होते. ६० घटिकेचा दिवस, या ८ प्रहरांत १२००० नाम होतात म्हणजे १०० नामाची माळ. १२० माळा ८ प्रहरांत होतात १ प्रहराला १५०० नाम म्हणजे १५ माळा. २० मण्याची मणगटी, १ श्वासोच्छ्वासाचीं अक्षरे १०. २१६०० श्वासोच्छ्वासाची अक्षरें २१६००० होतात व १२००० नामांची अक्षरें देखोल तितकीच होतात.

---



* * *